


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका








महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

□ अंक क्र. ३२६ : जुलै ते सप्टेंबर २००८

---






**महाराष्ट्र साहित्य परिषद**

टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०

दूरभाष - २४४७५९६३

अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका



मुद्रक-प्रकाशक
**डॉ. माधवी वैद्य,** प्रमुख कार्यवाह
**महाराष्ट्र साहित्य परिषद,** टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.
मुद्रणस्थळ
**जंगम ऑफसेट प्रा. लि.,** २५/१० नांदेड फाटा,
सिंहगड रस्ता, पुणे - ४११ ०४१
**किंमत १५/- रुपये**
प्रकाशन : सप्टेंबर २००८

संपादकीय

# शुक्तिबिंदू योग !

डॉ. सु. प्र. कुलकर्णी

कविता म्हणजे शब्दभावाचे नादावयवी नाते !

'भावार्थ' आणि 'यथार्थ' यांचा संघर्ष नवा नाही. शब्दांसाठी रानोमाळ होणारा कवी वेडाच समजला जातो. स्वाती नक्षत्राचेच पाणी पिण्यासाठी चोंच वासून प्रतीक्षेत बसलेला चातक आहे की नाही, हे वास्तव शोधायची गरज नाही. शब्दांच्या विराट जगतात भावानुभूती व्यक्त करण्यासाठी, शब्दांसाठी व्याकुळ झालेला कवी म्हणजे 'चातक'च ! अमृतानुभव व्यक्त करण्यासाठी शब्द सापडणे, हा 'शुक्ति-बिंदू' योग ! भाव व्यक्त करण्याची धडपड, कासावीस आणि उत्कटता शब्दाशी जुळून येते, तो क्षण कवितेचा असतो. 'शब्दांनो! मागुते या !' म्हणून केशवसुत टाहो का फोडतात ते यथार्थवाद्यांना समजणार नाही. एका तागडीत व्यवहाराचे माप आणि दुसऱ्या तागडीत मापाच्या तोलाने वस्तू विकण्याचा धंदा करता आला नाही; म्हणून तुकोबाचे दिवाळे निघाले ! 'शब्दचि आमुच्या जीवाचे जीवन !' म्हणत ते भक्तिभाव व्यक्त करण्यासाठी अभंगरचनेचा ताल शोधत भंडाऱ्याच्या डोंगरावर ज्ञानेश्वरांच्या प्रतिमावर्षावातील अमृतानुभव अभंग करण्यासाठी सर्वस्व लुटविले.

भावानुभूती देण्यासाठी शब्द अपुरेच पडतात. मग कवी प्रतिमासृष्टीकडे ओढला जातो. दृष्टसृष्टीच्या आधाराने अदृष्ट, अशरीरी काव्यचैतन्याला रूप देण्यासाठी प्रामुख्याने निसर्गसृष्टीकडे धाव घेतो. निसर्ग हे चैतन्याचे दुसरे रूप आहे. निसर्ग-मानव हा एक सखोल संवाद आहे. निसर्गातून प्रकट होणारे चैतन्यसत्य मानवाला आवाहन करणारे; आणि परिसराशी गूढ नाते निर्मिणारे आहे. त्यामुळेच प्रवरेकाठी भावार्थदीपिका प्रकटली. 'वृक्ष-वल्ली आम्हां सोयरे...' म्हणत शतकोटी अभंगाचा संकल्प पूर्ण झाला. केशवसुतांची 'झपूर्झा' यशवंतांची 'आंबराई', ग. ह. पाटलांच्या 'लिंबोळ्या', बालकवींचा 'औदुंबर', कुसुमाग्रजांची 'चिरविरही पृथ्वी', माधव ज्युलियनांचा 'संगमोत्सुक डोह', आरती प्रभूंचे 'नक्षत्रांचे देणे' सावरकरांचा 'सागर' येथपासून ते थेट ना. धों. महानोर, ग्रेस इत्यादींनी निसर्गप्रतिमांमधून कविता पाहिली. तरीही शब्द आणि अनुभव यांचे द्वैत प्रतिमासृष्टीत राहतेच ! उपमा-उत्प्रेक्षा-रूपक आणि अपन्हुतीच्या पायऱ्यांवरूनही शब्दभाव अद्वैतावस्थेला पोहोचत नाहीत.

मग शब्द व्याकुळतो लयीसाठी ! तर्कातीत अनुभव फक्त संगीतानुभवातूनच शब्दभावाच्या नादगुणाने प्रकट होऊ शकतो. शब्दप्रतिमा आणि संगीतानुभव यांचे एकरूपत्व छंदातून शोधताना कविता नर्तन करू लागते. प्रतिभेच्या स्वप्नभूमीवर शब्द गाऊ लागतात, नाचू लागतात. अनुभवाच्या गूढतेशी नाते जुळवू लागतात. त्यावेळी शब्द मागे पडतात. एक लयसृष्टी-नादसृष्टी प्रकटू पाहते– गूढतेने ! भाषा अपुरी वाटते. 'ज्या भाषेत मी जन्मलो तेथेच मला अनाथ वाटू लागते' असे कवी ग्रेस का म्हणतात; ते कळू लागते. एका विराट उदासीनतेचा, नैराश्याचा प्रत्यय येऊ लागतो–

*'गेले द्यायचे राहुनी...*
*तुझे नक्षत्रांचे देणे...!''*

ही अपुरेपणाची व्यथा प्रकटते ! नैराश्य हाच काव्यविषय होऊ लागतो. 'अजुनी रूसून आहे...!' म्हणून तिचे रूसणे हाच काव्यविषय होतो. 'समजूत मी करावी- 'म्हणुनीच तू

रूसावे ।...' म्हणूनच 'धरिला असा अबोला' असे कवी अनिलांना वाटते. आयुष्यभर लिहिले तरी त्या रहस्यापर्यंत पोहोचू शकलो नाही; म्हणून कविवर्य तांब्यांच्या 'मधुघटा'ला रितेपणाची उदासीनता येते. ग. दि. माडगूळकरांची विरहिणी 'जोगिया' आळवत बसते. शब्दशिंपल्यात भावार्थाचे स्वाती बिंदू पकडण्याच्या 'शुक्तिबिंदु' योगाची अमर्याद उदासीन प्रतीक्षा हीच कविता होते. हीच प्रतीक्षा नाचू-गाऊ लागते. अर्थाच्या पैलतीराला जायचे कशाला ? पण व्यवहारी जगाला हा अशरीरी नादावयवी काव्यानंद रूचत नाही. कवितेपर्यंत पोहोचू न शकणारे खुरडत-खुरडत कवितेकडे अर्थाचीच याचना करतात. मग कवी ग्रेस म्हणतात—

*'शब्दाच्या अर्थाचीही*
*मज कधी न आली करुणा ।*
*ये डाळीसाठी तरी ही*
*कुणि पंख मोडली मैना ।'*

महाकवी भासाच्या नाटकांची राजदरबारी अवहेलना झाली म्हणून दुखावलेल्या भासाने अरण्यात एकान्तस्थळी अग्निकुंड पेटविले. उच्चरवाने अखेरचे वाचन करून एकेक पान अग्नीच्या स्वाधीन करू लागला. ते काव्यगायन ऐकून पशुपक्षीही अश्रू गाळीत- श्रवणस्तब्ध झाले. ही लोकविलक्षण वार्ता राजापर्यंत पोहोचल्यावर राजाने समक्ष जाऊन तो काव्य संहार थांबविला. त्यामुळे भासाची तीन आणि एक अर्धे नाटक रसिकांच्या भाग्याने जिवंत राहिले ! कवी भास ते ग्रेस यांची व्यथा एकच ! शुक्ति-बिंदू योग झाला; तरी 'अरसिकेषु काव्यनिवेदनम् शिरसि मा लिख ! मा लिख!! मा लिख !!!' ही व्यथा आहेच !

मग व्यवहारचातुर्य राखून ही वेदना लपवून कवी म्हणतो—

*गीत हवे का गीत ?*
*एक्या मोले विकतो मी*
*विरह आणखी प्रीत...!* (ग.दि.मा.)

एकूण काय ! सर्व काव्यप्रवास बालकवींच्या औदुंबरासारखा प्रेयांच्या काळ्या डोहात पाय सोडून संन्यस्त वृत्तीने अनामिक श्रेयाची प्रतीक्षा जगत आहे. शुक्तिबिंदु योगासाठी !.... चिरविरही ! कुण्या चारूदत्ताने फेकलेला निसर्गाचा 'शेला' हृदयाशी धरून पूर्णत्वाची वाट पाहणाऱ्या इंदिरा संतांच्या— वसंतसेना— वसुंधरेसारखी !

नवव्या शतकातील कवी राजशेखर याने काव्यपुरुषाची उत्पत्ती प्रतिपादिली आहे. आपल्या काव्यमीमांसेच्या तिसऱ्या अध्यायात ही रंजक साहित्यिक उपपत्ति आहे. सरस्वतीदेवीने पुत्रप्राप्तीसाठी तुषारगिरी-हिमालयावर-तपाचरण केले. ब्रह्मदेवाने प्रसन्न होऊन दिलेल्या वराने तिच्या उदरी काव्यपुरुष हा मुलगा जन्मास आला. त्याच्यापासून प्रथम 'छंदस्वती वाक्' छंदोमय वाणी-उत्पन्न झाली. आपल्या छंदोयुक्त वाणीने तो सरस्वतीआईला म्हणाला— 'जगतातील वाङ्मय अर्थरूपी देहाने प्रकटले आहे. शब्द हे त्याचे शरीर, अर्थ हे मन, भिन्न भाषा ही गात्रे, रस हा आत्मा, छंद हे केश व उपमानुप्रासादि शब्दालंकार ही आभरणे... ही सर्व माझीच रूपे आहेत.' सरस्वतीने काव्यपुरुषाला स्वर्गलोकी न नेता पृथ्वीवरच ठेवले. मात्र जाताना साहित्यविद्यारूपी स्त्री निर्माण करून तिचा काव्यपुरुषाबरोबर विवाह लावून दिला. साहित्यविद्येने काव्यपुरुषाला वश करून पृथ्वीवर आपला साहित्यसंसार थाटला. मात्र स्वर्ग हरपल्याची व्यथा मनी बाळगून ! देव आणि ऋषी यांच्यातील वादविवादाचा निर्णय देण्यासाठी स्वर्गलोकी गेलेल्या सरस्वतीने काव्यपुरुषाला स्वर्गाची ओढ लावली. युगायुगांची ही अपुरेपणाची ओढ शब्दरूपअर्थातून व्यक्त करण्यासाठी काव्यपुरुष अतृप्त आहे. मिल्टनचे 'पॅरडाईज् लॉस्ट' असेच !

काव्यपुरुषाची ही कथा पुरेशी बोलकी आहे. पृथ्वीवर स्वर्गलोक आणण्याच्या युगायुगांच्या प्रतीक्षेत काव्यपुरुष वाट पहात आहे— 'शुक्ति-बिंदू' योगाची !

कवितेविषयी एक विचार मांडण्याचा हा अल्पसा प्रयत्न !

**ह्या अंकात** कवितेचा ह्या अंगाने विचार करणारे लेख एकत्रित केले आहेत. कवी ग्रेस यांची काव्यमीमांसा त्यांच्या कवितेतच शोधण्याचा प्रयत्न डॉ. जोशी चं. वि. आणि डॉ. पोतदार यांनी केला आहे. कविता सादरीकरणातून कशी मूर्तरूप घेऊ शकते त्याचा विचार, स्वाती महाळंक यांनी संदीप खरे यांच्या मुलाखतीतून शोधला आहे. बेळगावच्या मीरा तारळेकर यांच्या भावकवितेचा रवींद्र शोभणे यांनी परामर्श घेतला आहे.



अनुक्रमणिका

त्यातून भावकवितेचे हार्द प्रकट होईल; अशी आशा आहे. स्त्रीशिक्षणाच्या ध्येयाने वेड्या झालेल्या सावित्रीबाईंच्या जीवनावरील खंडकाव्याचा विषय मंदा कदम यांनी कसा जिव्हाळ्याने मांडला आहे; त्या खंड काव्याचा परिचय डॉ. मंदा खांडगे यांनी करून दिला आहे. 'निवडक नवे' या सदरात प्रा. मिलिंद जोशी यांनी निवडक कवितासंग्रहाचा धावता आढावा घेतला आहे.

कवितेचा एक विभ्रम 'वात्रटी'च्या रूपाने लोकप्रिय झाला आहे. गंभीर प्रकृतीच्या चिंतनशील कविता लिहिणाऱ्या अंजली कुलकर्णी यांनी रामदास फुटाणे यांच्या 'वात्रटी'चा 'भाष्यकविता' म्हणून 'आस्वाद' घेतला आहे. तो चिंतनीय आहे. काही मान्यवरांचे लेख मागविले होते. ते आले असते तर ही काव्यचर्चा पूर्ण झाली असती; असे होणार नव्हतेच ! त्यामुळे कवितेप्रमाणेच काव्यचर्चाही पूर्णत्वाच्या प्रतीक्षेत अपुरीच ! त्यास, हा कवितेला वाहिलेला अंकही अपवाद नाही.

याशिवाय पुस्तक परीक्षणे, अहवाल यांचा समावेश आहे.

समीक्षा आणि संशोधन परिभाषेच्या आवर्तात सापडून शब्दजड होणार नाही; याकडे लक्ष दिले तर साहित्याचा वाटसरूही त्याचा आस्वाद घेऊ शकेल. 'प्रमेयांची उद्याने' करण्याचे आपले सामर्थ्य नसले तरी भाष्यकारांची वाट न चुकविता 'ग्यानबाची' समीक्षा लोकाभिमुख आस्वाद्य होईल याची काळजी घेणे आवश्यक आहे.

नेहमीप्रमाणे याही अंकाचे भरभरून स्वागत होईल अशी अपेक्षा आहे.

(संपादक)

७ गायकवाड कॉलनी, सावेडी रोड, अहमदनगर.

## महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या घटनेसंबंधी निवेदन

महाराष्ट्र साहित्य परिषदेची सन २००१ पासून अमलात असलेली घटना पुनर्रचित करण्याचे काम सध्या चालू असून त्यासंदर्भात गेल्या सहा महिन्यात घटना समितीच्या तीन सभा आयोजित करण्यात आल्या होत्या. या सभांच्या द्वारे घटनेच्या संदर्भातील विशेष नोंदी संकलित करणे, कायदेशीर कागदपत्रांची जुळवाजुळव करणे, परिषदेच्या सभासदांशी पत्रव्यवहार करणे व त्यांच्याकडून सूचना मागवून घेणे. सभासदांनी पाठविलेल्या पत्रांचा परामर्श घेणे अशी काही प्राथमिक स्वरूपाची कामे हातावेगळी करण्यात आली आहेत.

साहित्य पत्रिकेच्या एप्रिल ते जून २००८ या कालावधीसाठी प्रकाशित झालेल्या अंक क्र. ३२५ मधून घटनेच्या संदर्भात एक निवेदनही देण्यात आले होते, हे आपणास माहीत असेलच. या निवेदनाद्वारे परिषदेच्या सभासदांकडून घटना दुरुस्ती संदर्भात सूचनाही मागविण्यात आल्या होत्या. सभासदांनीही आमच्या प्रयत्नांना चांगला प्रतिसाद देऊन आमचा उत्साह द्विगुणीत केलेला आहे. घटना समितीवरोबर राहून सभासदांनी घटनेच्या पुनर्रचनेच्या कामात आपला सहभाग दिला ही घटना, समितीच्या दृष्टीने समाधानाची बाब आहे.

परिषदेच्या सभासदांना या निवेदनाद्वारे पुन्हा एकदा सूचित करण्यात येत आहे की, परिषदेच्या विद्यमान घटनेतील 'उद्दिष्टे, नियम व उपनियम तसेच शाखांसंबंधीचे नियम या संदर्भात काही सूचना किंवा दुरुस्त्या सुचवायच्या असल्यास त्यांनी त्या पत्राद्वारे निमंत्रक, श्री. रत्नाकर कुलकर्णी, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे-३० यांच्याकडे दि. १५ नोव्हेंबर २००८ पूर्वी पाठवाव्यात; ही विनंती.

आपले,

रत्नाकर कुलकर्णी
(निमंत्रक)

राजा फडणीस
(अध्यक्ष)

अनुक्रमणिका

□
# 'ग्रेस : पाऊसशैली आणि मातृवनातील स्पंदने : काही संदर्भ
□
डॉ. चं. वि. जोशी



कोणत्याही उत्तम साहित्यकृतीचा निर्माता जसा एक सहृदय कलावंत असतो; तसा तो व्यावहारिक जगणे जगणारा एक सामान्य माणूसही असतो. पण काही संवेदनशील कलावंत मात्र आपले वास्तव जगणे व कलापूर्ण जगणे यातल्या सीमारेषा पुसून टाकतात. आधुनिक कवितेत स्वतःचा नावीन्यपूर्ण ठसा उमटविणारे कवी ग्रेस यांचे अवघे जगणेच एक कविता आहे. मेकॉले याने 'कल्पनेचे भ्रम-रुप वा भासचित्र (इल्युजन) शब्दांद्वारे निर्माण करण्याची कला म्हणजे कविता' असे म्हटले आहे. ग्रेस यांच्या कवितेबाबत या भासरुपाचा वस्तुनिष्ठ प्रत्यय येतो. कवीजीवनाशी संबद्ध अशा कल्पना-घटनेचे चित्रण या कवितेत सौदर्यात्म अनुभूतीने आविष्कृत होते. 'मितवा'च्या संदर्भात या विधानाचा अन्वयार्थ लावताना मलपृष्ठावर म्हटले की, "...चरित्रगत वास्तवात नेहमीच सत्य, स्वप्न व भास यांचे जटिल संमिश्रण होत गेल्यामुळे कविप्रतिभेचा एक वेगळाच खासगी आविष्कार या ललितबंधामधून जाणवत राहतो."[१] ग्रेस यांचे काव्य-चरित्रगत वास्तव सत्य, स्वप्न आणि भास यांचे जटिल संमिश्रण आहे. या तीनही घटकांचे पदर एकमेकात अधिकाधिक गुंतलेले दिसतात.

'संध्याकाळच्या कविता', 'राजपुत्र आणि डार्लिंग', 'चंद्रमाधवीचे प्रदेश' आणि 'सांध्यपर्वातील वैष्णवी' या महत्त्वाच्या काव्यसंग्रहात ग्रेस यांची कविता समाविष्ट झालेली आहे. हे सर्व कवितासंग्रह एकापेक्षा विभिन्न असूनही ग्रेस यांच्या काव्यशैलीचे मनोहारी नमुने आहेत. संध्याकाळ, पाऊस, बर्फ, आई, लौकिक-अलौकिक व्यक्तिरेखा, घोडा, धूळ, चंद्र-सूर्य, पक्षी, कावळा, रंग, पौराणिक प्रतिमा या आणि अशा वैविध्यपूर्ण घटकांनी ही कविता श्रीमंत होत जाते. यातील काही घटकांचा विचार करता येईल.

**ग्रेस यांची पाऊसशैली -**

ग्रेस यांच्या कवितेतील पाऊस पारंपारिक अर्थाने पाऊस म्हणून येत नाही. उदासी आणि दुःख या भावनांशी त्याचे नाते आहे. किंबहुना या भावनांचेच ते रूप आहे.

*उद्ध्वस्त फुलांच्या परागातून यावेत*
*सोनेरी पावसाचे*
*अनोळखी संकेत---*
*जसे जीविताच्या या मोहांत समुद्र आणि*
*त्याचे दीर्घदुःख पाणी*

हा पाऊस जेव्हा 'उद्ध्वस्त फुलांच्या परागातून' येतो. तेव्हा त्यातून आलेली विदीर्णता, दीर्घदुःख यातली खिन्नता मनाला थिजवून टाकते. 'बाहेर बर्फाचा पाऊस पडतो आहे' असे म्हणून हे थिजलेपण अधिक घट्ट होते. कवीच्या जीवनाचा व्यामोह दुःखाळलेल्या पावसाने अधिक ओलाचिंब होतो आहे.

गावात कोसळणारा पाऊस आपल्या आगमनापूर्वीच धुळीने क्षितिज मळवून टाकतो. पावसाचे येणे असे, तसे ते दुःखाचेही. यातूनच कवी आपल्या अनाथपणाचे दीर्घदुःखही स्पष्ट करतो. पावसाचाच आधार मागत आईच्या स्मृती उजळल्या जातात.

*तू मला कुशीला घ्यावे*
*अंधार हळू ढवळावा*
*संन्यस्त सुखाच्या काठी*
*वळिवाचा पाऊस यावा*

(सं. क./आठवण, पृ. ५४)

आईने कुशीत घेण्याची अनावर सुखप्रतीती वळिवाच्या पावसाचा आवेग सांधणारी आहे. हा पाऊस कवी दुःखाशी साधर्म्य साधतो. एका कवितेत याची जाणीव अधिक तीव्र होते.

*पाऊस कधीचा पडतो*
*झाडांची हलती पाने*
*हल्केच जाग मज आली*
*दुःखाच्या मंद सुराने*

(सं. क./पाऊस, पृ. २६)

ग्रेस यांचे भावविश्व दुःखभरल्या याच गहिऱ्या पावसाने समृद्ध केले आहे.

'चंद्रमाधवीच्या प्रदेशा'त सतत कोसळणारा हा पाऊस कवीच्या भासाभासाच्या पटलावर आठवणींची विभिन्न रूपे घेऊन येतो. उदा.

*पाऊस*
*देवळाजवळचा;*
*पाराजवळचा*
*पाऊस.*
*देवळापल्किडचा;*
*पारापल्किडचा*
*पाऊस.*
*सर्व...*

(चं.प्र./पाऊस, पृ. ०४)

हा पाऊस रस्ता, काळोख, वस्ती, गल्लीबोळ, पाताळ, समई, डोळे या सर्वांत भरून उरलेला आहे. सर्वत्र कोसळून राहणाऱ्या या पावसाचे व दुःखाचे उगमस्थान आईच आहे. म्हणून तर आईसाठी अर्ध्या रात्री येणारा पाऊस सूचक आहे.

*दार वाजले घरात*
*कोण उभे अंगणात*
*अर्ध्या रात्रीचा पाऊस*
*तुझ्या वाजतो मनात*

(चं.प्र./कवच कुंडले, पृ. १०)

अर्ध्या रात्री मनात वाजणारा पाऊस शृंगारछटेशी संमीलित होतो. परिणामी 'तिला हाताशी घेऊन' झडझडीचा पाऊस डोळे भरून पाहण्याची लालसा मनात उत्पन्न होते. पावसाच्या मुक्त झडण्यातच आणाभाका घेतल्या जातात. शृंगार आणि दुःख यांच्या बेभान झडण्याशी पाऊस एकरूप होतो.

*पाऊस पडला मोहोर झडला, उचला ग कोणी*
*उधळून द्या ना यौवन सगळे, माझ्या मायाबहिणी*

(चं.प्र./मोहर, पृ. १५)

अशी निसर्ग आणि मानवी भावसंबंध यांची सुरेख वीण येथे दिसते. तर 'ढगात लपले, मनात हसले ऊन सोनियाचे' मधून सुचविलेली सुखाची हळवी प्रत्ययकारिता, पावसाळी मातीत 'मळवून टाक पाय चंदनाचे' या अनोख्या सुखरीतीत व्यक्त होते. पुढे 'मातीचा गंध लुटाया सुटलेला भिंगरवारा' ज्या गतीने येतो; त्याच बेभान स्थितीत यौवनही उधळण्याचा संदेश दिला जातो. 'घरकुल' आज ना उद्या बांधता येईल असे समजून यौवन उधळण्याला अपार महत्त्व दिले जाते. स्त्रीच्या अभिसाराकडे सौंदर्यदृष्टीने पाहताना 'चोळीबांगड्डी दर्पणबिंदी' चा उल्लेख करून पावसातील न्हालेल्या स्त्रीचा चित्रमय संदर्भ दिला जातो. 'पाऊस चिंब माती तुडवित गाणं गाण्याचा सोस' बाळगून पावसाच्या झरण्याबरोबर जीव पणाला लावण्याची आणभाकही घेतली जाते. तर 'पाऊसगाणे' मध्ये ग्रेस दयाघनाची प्रार्थना करू पाहतात.

*पाऊस आला, पाऊस आला*
*गारांचा वर्षाव*
*गुरे अडकली रानामध्ये*
*दयाघना तू धाव*

(चं.प्र./पाऊसगाणे, पृ. २८)

या पावसामुळे चिमुकला गाव वाहून जाण्याची भीती आहे, पक्ष्यांच्या डोळ्यांत वृक्ष थबकलेले आहेत, त्यांच्या मुळांना वेडघेतले वारे उपटू पहाताहेत, पुरात नावा फसल्या आहेत. परिणामी अशा पावसाने आपल्या हृदयात थांबावे; अशी करुणार्तताही व्यक्त केली आहे. कवींची ही व्यापक संवेदना त्याला भावविवश करते आहे.

ग्रेस यांना 'वसंताच्या पूर्वार्धातील पावसा'चे सत्य सापडत नाही. पण 'प्राक्तनातील घळी' मध्ये मात्र पावसाचे पाणी असते हे ते निःसंशयपणे सांगतात. असा मेघांना भुलवून खाली उतरणारा पाऊस प्रियेच्या आठवणींचाही उद्गाता आहे. त्यातही खोलवर थांबलेले दुःखच प्रत्ययाला येते. 'झिमझिम पाऊस कुठे पडावा /

तशी सखी दुखियारी' (पृ. १५४) असा काव्यात्म अनुभव मन विदीर्ण करतो.

'चंद्रमाधवीचे प्रदेश' यात पावसाची मुख्यतः कुंवारणीचा भांग झेलणारी पावसाची सर / घनघोर पाऊस / रंगीत पाऊस / सुगावा न लागणारा पाऊस / शीळ मुकी करून टाकणारा धारांचा वर्षाव / शेतात पडणारा पाऊस / मोगरा पाऊस / शुभ्र धारांचा पाऊस / ओसाड दरीतून वाहणारा पाऊस / दिशाहीन पाऊस / अशी विविध रूपे दिसतात.

'राजपुत्र आणि डार्लिंग' मधील पाऊस स्वतःचे व्यक्तिरूप धारण करणारा आहे. तो मंदपणे येणारा, प्रत्येक ऋतूत येणारा पाऊस आहे. या पावसाचे वर्णन 'पाऊस म्हणजे मैलोगणिक शांतपणे सरकणाऱ्या पक्ष्यांच्या अमित रांगा' किंवा 'मोरांच्या झुंडीला अचानक लागलेल्या रक्तविस्ताराचे वणवे' असे केले जाते. 'मुसळधार पावसात वृक्षांच्या गळ्यातील घंटा वेगाने वाजतात' असे पावसाचे अस्तित्व रेखाटताना ग्रेस लिहितात,

*पाऊस पसरत जातो, दिशाहीन होतो*
*त्याला नसतो साजण*

(राजपुत्र आणि डार्लिंग, पृ. १६)

असा सर्वत्र संचार असलेला 'पाऊस मुका असतो का?' असा डार्लिंगला प्रश्न विचारून कवी स्वतःला पावसासोबतच 'विश्व रहस्या'ला जोडून घेतो. आपले गाणे, आपले घनघोर केस, आणि घनव्याकुळ दुःख या सर्वांचे अविभक्तपण पावसाशीच असल्याचे ग्रेस सुचवितात. पावसाचे सारेच विभ्रम कवी आपल्या जीवनाशी बांधून घेतो. निसर्गाच्या या प्रलयंकारी आणि हळव्या रूपगंधाशी इमान राखणारे ग्रेस आपल्या कवितेतून या निसर्गरूपाचा उत्कट भावप्रत्यय आणून देतात. पावसाची प्रतीकशक्ती कवितेच्या भावावस्थेशी अतिशय दृढपणे निगडीत आहे.

**ग्रेस यांच्या कवितेतील व्याकुळ मातृस्पंदने—**

ग्रेस यांची कविता मातृयातनेची व्याकुळता व्यक्त करते. त्यांच्या समग्र कवितेचे वैशिष्ट्यपूर्ण बलस्थान म्हणून त्यांच्या 'आईविषयक' कवितांचा उल्लेख करावा लागतो. कवीच्या एकूणच दुःखाला ही कविता व्यापून राहते. एक अपत्य या नात्याने आईची कवीशी असलेला भावसंबंध महत्त्वाचा आहे.

ग्रेस यांच्या व्यथालयात आईचे सारेच संदर्भ मन पिळवटून टाकणारे का येतात ? तिच्या आठवणीसरशी दुःखच का जागृत होते ? तिच्याविषयीच्या श्रद्धेला तडा का जातो ? ग्रेस यांच्या बावत हे व्याकुळ करणारे दुःखही संध्याकाळी व अतीव होते. ते म्हणतात,

*या व्याकुळ संध्यासमयी*
*शब्दांचा जीव वितळतो*
*डोळ्यांत कुणाच्या क्षितिजे*
*मी अपुले हात उजळतो—*
*तू आठवणीतुन माझ्या*
*कधी रंगित वाट पसरशी*
*अंधारव्रताची समई*
*कधी असते माझ्यापाशी*
*तू मला कुशीला घ्यावे*
*अंधार हळू ढवळवा*
*संन्यस्त सुखाच्या काठी*
*वळिवाचा पाऊस यावा...*

(सं.क./आठवण, पृ. ५४)

मातृवात्सल्याचे हरवलेले क्षितिज या सर्वभोर दुःखाचे कारण आहे. तिच्या आठवणीतून आपलेच हात उजळत समाधान शोधण्याचा प्रयत्न केला जातो. कवीला आलेल्या या पोरकेपणाची व्याकुळ अवस्था यात व्यक्त होते. 'रंगीत वाट' पसरणारी आई आणि 'अंधार व्रताची समई' या दोन प्रतिमांतून त्याची खोली अधिक खोल होत जाते. अंधार ही प्रतिमा घनदुःखाचे रूप घेऊन येते. या दुःखावर फक्त आईची कूस हाच उपाय आहे. तिच्या कुशीत जाण्यासाठी तो तिचीच वाट पहातो आहे—

*तू येशील म्हणून मी वाट पहातो आहे*
*तोही अशा कातरवेळी—*
*आणि आणि नसलेल्या पोरासारखे हे माझे*
*शहाणे डोळे हलकेच सोडून देतो*
*नदीच्या प्रवाहात...*

(सं.क./वाट, पृ. ६२)

अनाथपणाची एक सुजाण प्रतिमा आणि पोरकेपणातून आलेला शहाणपणा इथे स्पष्ट होतो. कालप्रवाहाचे दर्शन घडविणारा नदीचा प्रवाह त्या अनाथ मुलाच्या डोळ्यांना स्वीकारतो. 'रंगास्त' मधून हा पोरकेपणा, ही पराधीनता

व अनाथपण प्रकर्षाने जाणवते. ग्रेस यांनी म्हटले की, ''आई गेल्यापासून जो अनाथपणा आला आहे; तो मात्र नंतर जीवनातल्या कोणत्याही नात्यांनी मोहरी एवढासुद्धा भरून निघालेला नाही. पण त्याचबरोबर माझ्या अंगावर अनाथपणाचे हे लक्तर ज्या बिंदुपाशी आईने भिरकावले, त्याच बिंदुपासून मी पळत नसतानाही ती माझा सारखा पाठलाग करते आहे. ती सतत अवती भवती आहेच.''२ कवीला आईविषयी आत्यंतिक ओढ आहे. ती वास्तवात भेटत नाही म्हणून कवितेच्या निर्माणशक्तीतून तिच्याशी मूक संवाद साधला जातो. ती कवितेतून सतत भेटते. याविषयी त्र्यं. वि. सरदेशमुख यांनी या अनाथपणाचे मर्म फार आर्तपणे सांगितले आहे. ते म्हणतात, ''संध्याकाळच्या कविता धुक्यात निर्माण होतात. आभासांनी गजबजतात. आंधळ्या-पांगळ्या-मुक्या प्रतिमांचे शिल्प उभे करतात आणि एका अंतहीन प्रतीक्षेत क्षितिजाकडे डोळे लावून बसतात. याचे कारण मरणाधीन झालेल्या जन्मदात्रीच्या चिंतनाने त्या भारावलेल्या आहेत. यातूनच एक नवा जन्म होतो, हरवलेली आई ग्रेस यांना आपल्या कवितांच्या निर्मितीच्या क्षणी आपल्यातल्याच सृजन शक्तीत भेटते; भेटावीशी त्यांची अपेक्षा असते.''३ मातृविषयक व्याकुळ भावनांचे कोंभ कवितेच्याच रानात फुलू लागतात. शब्दांनी व्यापलेल्या या सघन अर्थाला पोरकेपणाचे दुःख कवेत घेते. हा पोरका भाव आईच्या सचित्र आठवणींत व्यक्त नि व्यथित होताना दिसतो.

ग्रेस यांना स्त्रीच्या विविध रूपात आई भेटते. पर्यायी आईच्या मानसदर्शनाचा एक ध्यास सर्वत्र निनादत राहतो. आईच्या कुशीला 'चंद्र भरून युगांची स्तब्धता निजली' आहे असे त्यांना वाटते. तिचे 'मोगरीचे गाणे फुली निनादून' येते. या आईनेच आपल्याला पोरकेपणाचे दुःख दिले याची बोच कवीला आहे.

'उजेडाची घडी' मध्ये ते म्हणतात.

*सांग बकुळीची कथा*
*अश्रु भारून जरासा*
*डोळे विझण्याच्या आधी*
*मला पाहू दे आरसा*

या ओळीतून एक याचना व्यक्त केली आहे. त्र्यं. वि. सरदेशमुख यांनी याविषयी एक संदर्भ 'धुके आणि शिल्प'

यात नोंदला आहे.

*म्हणून बांधिले ऊन्हात का घर*
*तडफडे ऊर आठवता*

(घर, पृ. १९)

'चंद्रमाधवीचे प्रदेश' मध्येही आईविषयी कितीतरी संदर्भ येतात. सुमित्रा, कुंती, मिथिला, उर्मिला, द्वारका, द्रौपदी, आदि स्त्री प्रतिमांतून कवीची मातृविषयक भावनाही स्पष्ट होते.

तिच्या यातनेची परमावधी एका कवितेत दिसते. 'घर' या कवितेत ग्रेस लिहितात.

*रंगीत खेळणी माझी*
*ही दे ना मंज खेळाया*
*इवल्याशा बाळ मुठीतुन*
*घे काढून माझी काया*

बालपणाचे कोणतेच कौतुक, सोहळे, अंगाईचे गाणेही आईकडून मिळाले नाही. कितीतरी दिवसांनी, कुठल्यातरी एकांतक्षणी हे सारे 'जुने' असले तरी आठवून जाते.

**संगमरवरी स्वप्नाची भाषा—**

ग्रेस यांच्या कवितेची भाषा-निर्मिती श्रीमंत शब्दकळेची द्योतक आहे. ग्रेस यांच्या कवितेतील प्रतिमाविश्व सर्वसाधारण नाही. प्रतिमा आणि त्यांचे उपयोजन, सुसंगती, त्यांचे संयुक्तिक व साहचर्यनिष्ठ अर्थ, त्यातून प्रतीत होणारे सौंदर्य आणि संभ्रम, यातून काही प्रश्न उपस्थित होतात. या वैविध्यपूर्ण आणि सौंदर्यजटिल भाषा-प्रतिमांच्या संदर्भात संभ्रमाचे धुके निर्माण होते. ग्रेस यांनी तर 'शब्दापेक्षाही मला अर्थाचा नादगुण उदासवाणा' वाटतो, असे म्हटले आहे. 'संगमरवरात स्वप्न लपवून ठेवण्याचा शाप भोगणाऱ्या' या कवीची कविता केवळ तर्कावर जोखता येत नाही. अनेकदा ही भाषा प्रतिमांची की प्रतीकांची असाही प्रश्न निर्माण होतो. ग्रेस यांनी स्वतःला प्रतीकवादी म्हटले आहे. त्याच्या मुळाशी त्यांचा एकटेपणाच आहे. त्यांचा एकाकीपणा किंवा संन्यस्तपणा कोणत्याही आध्यात्मिक भावनेतून अथवा अद्वैतवादातूनही आलेला नाही. तर, 'It might be lonliner without lonlyness' अशी ही मीमांसा आहे. ग्रेस यांच्या व्यक्तित्त्वात मूलतःच संक्रांत झालेल्या 'metaphysical' आणि 'spiritual passions' चा हा परिणाम आहे. या प्रतिमा, समासप्रचुरता नि विशेषणपूर्णता, या वैशिष्ट्यांनी समृद्ध आहेत. उदा. हिमगंध, भुरभुरत्या संधिप्रकाशात भिजलेले कार्तिकातील धुके, पळस पेटला पारवा, चंद्रगंध, बर्फाचे चर्च, रंगांध, सूर्य, चंद्रमोजणी, हिमवृक्ष प्रारब्धवादी हिवाळा, शिल्पउदासी, सारथी, पालखी, घोडा, कावळा, गंगा, फकीर, ऊद, सवत साजण इ. प्रतिमा-प्रतिके ग्रेस यांच्या अनवट भाषाशैलीचा, नवीनतम शब्दकळेचा प्रत्यय आणून देतात. त्या ग्रेस यांच्या व्यक्तित्वाच्या निदर्शक आहेत. प्रतिमांच्या अनावर निर्मितीमुळे आणि शब्दाशब्दांच्या नव्या संरचनेमुळे त्या दुर्बोध वाटतात. त्यांची भाषिक वीण उकलली पाहिजे. ग्रेस यांच्या कवितेचे तेच तर गूढ आहे.

---

**संदर्भ :**


१.मितवा, मलपृष्ठ, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई-३४, प. आ. १९७८.
२.त्र्यं. वि. सरदेशमुख, धुके आणि शिल्प, सन पब्लिकेशन, पुणे-३०. प.आ. १९८५, पृ. १०२.
३.तत्रैव, पृ. १०३.



**डॉ. चं. वि. जोशी, प्रपाठक**
पदव्युत्तर मराठी-विभाग व संशोधन केंद्र,
अहमदनगर महाविद्यालय, अहमदनगर.
भ्रमणभाष : ९३२६०७११८९





अनुक्रमणिका

□

कवी ग्रेस यांचे कवितेविषयी मुक्त चिंतन

# 'मी हलेन अश्रूपुरता, मी निजेन स्वप्नाकाठी !'

□

प्रा. डॉ. चंद्रकांत पोतदार



स्थळ : इचलकरंजीतलं 'स्वानंदी'चं अंगण.

वेळ : एक रमणीय संध्याकाळ.

निमित्त : स्वरब्रह्म आणि शब्दब्रह्म यांच्यातील मुक्तसंवाद.

उपस्थिती : कविता व गायनावर प्रेम करणारे निमंत्रित रसिक.

अंतर्बाह्य ओथंबून गेलेल्या रसिकांची उत्सुकता, टाळ्यांच्या कडकडाटात दोघांचंही आसनस्थ होणं. स्वरब्रह्म पंडित हृदयनाथ मंगेशकर आणि शब्दब्रह्म कविवर्य ग्रेस या दोघांची नेहमीची बैठक. पंडितजींची खास खुर्ची, समोर हाताशी पेटी, उजव्या बाजूला दोन तबलजी, मागील बाजूस एक संगीतवादक, डाव्या बाजूला खुर्चीत टी शर्ट घातलेले आत्ममग्न कवी ग्रेस. स्वतःशीच मूकसंवाद सुरू असल्यासारखे धीरगंभीर मुद्रेत आसनस्थ. रसिकांची उत्कंठा अधिकच वाढलेली. वातावरणात गंभीरता. काय संवाद होणार आहे ? अशा संभ्रमात असतानाच पंडित हृदयनाथजींनी अगदी नम्रपणे लतादीदींच्या स्वराची उंची विशद केली. शिवाय कवी ग्रेस यांच्याशी झालेला पत्रव्यवहार, ग्रेस चालवत असलेल्या 'संदर्भ' मासिकासाठी 'तिन्हीसांजा' या विषयावर पाठवलेला लेख, आयुष्यात तिन्हीसांजेला असणारं महत्त्व, लतादीदींमुळे आम्ही भावंडे वाढलो– सन्मानानं वाढलो, सांगलीतल्या आठवणी, साधं घर– साधी माणसं– कुटुंबप्रिय दिदी. अशा असंख्य आठवणींना वाट करून देत पंडितजी बोलते झाले. प्रसिद्ध कवी भा.रा. तांबेंच्या रचनांमधली श्रेष्ठता उलगडून दाखवत आपल्या स्वरब्रह्मांनी उपस्थितांना जिंकलं. 'तिन्हीसांजा सखे मिळाल्या' या भा. रा. तांबे यांच्या कवितेला आपल्या स्वरात बांधून अभिजात गाण्याच्या आस्वादाची जणू संधीच दिली. पं. हृदयनाथजींनी गेली कित्येक वर्षे मराठी माणसाच्या मनात आपले स्थान निर्माण केले आहे. मात्र [illegible], पुरस्कार, साहित्यसंमेलने, व्यासपीठीय कार्यक्रम यापासून कित्येक मैल दूरवर असणाऱ्या कवी ग्रेस यांच्याबद्दची कमालीची उत्सुकता होती. अशा दोन प्रतिभावंतांचा संवाद अनोखाच होता. संवादापूर्वीच पंडितजींनी तांबेंच्या कवितेचं सादरीकरण केलं. 'सखे गं वैरीण झाली नदी' मधले सगळे स्वरबिंदू रसिकांसमोर ठेवले आणि कवितेकडे, मराठी अध्यापन आणि मराठी भाषेचा गांभीर्याने विचार करणारे कवी ग्रेस यांच्याकडे त्यांनी सूत्रे दिली.

कवी ग्रेस, 'Creativity is my life and its conviction is my character' ही ग्रेस यांनी जपलेली सर्जनशीलतेविषयीची जीवनरेखा, जणू काव्यप्रेषिताचे हे घोषवाक्यच ! नेहमीच गूढ– गहनतेच्या वर्तुळात राहणाऱ्या या कवीविषयीची उत्सुकता शिगेला पोहोचलेली; आणि ग्रेस बोलू लागले, भाष्य कसले, ते जणू स्वगतच !

'व्यक्ती वेगळी असते. विभूती वेगळी असते; पण व्यक्ती विभूती असतेच असे नाही. सर्वसामान्य माणसं आपल्या परीने जगतच असतात. मात्र जो अस्सल कलावंत असतो, तो वेगळाच. अस्सल कलावंताचं जगणंच वेगळं असतं. राजदरबारातील राणी महत्त्वाचीच आहे, पण राणीपण आणि ताकद याशिवाय दुसरं असतंच काय तिथं ?

*'ऊस चीज की क्या जिक्र*
*जिसकी मुमकीन नही !'*

म्हणून म्हणतो, वाळवंटात सावलीची भिंत तुम्ही मागू लागला तर मी कुठून आणू ? कारण वाळवंटात सावलीची भिंत मागू नये, ही अत्यंत साधीशी गोष्ट आहे.

*'अपना पता नहीं की यार न मिला !'*

निसर्गाला शब्दांच्या आविष्काराची देणगी नाही, नाहीतर हिमालयसुद्धा स्वतःचंच कौतुक करीत बसला असता. निसर्गाचा विराट आविष्कार, सुंदर-असुंदरतेचे वेगळेपण यातूनच माझा अखंड प्रवास सुरू असतो. कवितेची आतली नस मला बोलकं करते. एखाद्याच्याच काव्यकृतीत एखादी वीण सापडते, पशूला नाही संवेदनेच्यापलीकडे जाता येत ! मी माझ्या शब्दांशी सतत बोलत राहतो. मला लोक काय म्हणतात म्हणोत.

'आखिर तो गुनाहगार हूँ मैं, काफिर तो नहीं !'

सोन्याचीच परीक्षा फक्त अग्नी घेत नाही; लोखंड-पितळ-तांबे यांचीसुद्धा घेते.—

*'अग्नी नाही घेत*
*बाभळीचा मक्ता*
*चंदनाची चिता*
*जाळतोचि !'*

विसंवादालाही एक धार असते ती अशी. अग्नी यातनामय आहे. मी माझी अनुभूती मनाच्या खोल डोहात जाऊन अनुभवत असतो. कातडं सोलून निघतं तेव्हाच शब्द सापडतो मला.

*'संभल के पीना, इसे सब शराब कहते हैं ।'*

ईश्वरावर श्रद्धा आहे, पण ईश्वर काय बोलतो यापेक्षा मी काय ऐकतो हे महत्त्वाचं, हे माझं द्वैताचं नातं आहे. सृजनशील तत्त्वांचा कुणी पराभव करू शकत नाही; ही खात्री आहे माझी. निसर्गसत्तेतून जे झिरपत येते ते तरल व अवजडही खूप असते.'

स्वगतपर या बोलण्यातच मार्मिक व खोचक विनोद, समयसूचकता, त्यातही सुजाण वाचकांना खोच ठरलेली असायची. मात्र असंख्य संदर्भांचे दाखले, विषयाची रेलचेल, बोलण्यातली आश्वासक उत्स्फूर्तता, ओघवती शैली, पहाडी धारदार आवाज, ऊर्दू व इंग्रजी भाषेचा अत्यंत सहजपणे केलेला वापर, शब्दांमधला ठोसपणा, आवाजातील शब्दाशब्दाला बदलणारी खुबी, उर्दूतला लहेजा, चेहऱ्यावरचे बदलत जाणारे हावभाव, लयीत हलणारे हातवारे, कवितेला— त्यांच्या मुक्तचिंतनाला कवेत घेईपर्यंत दिलेले दुसरे उदाहरण या सगळ्यांमुळे कवी ग्रेस यांचं बोलणं रसिकांना अंतर्मुख करतं. ग्रेस बोलतच राहतात—

'मी पंडितजींना स्वरपुरूष म्हणतो. कारण कवितेतलं संगीत आणि संगीतातली कविता कळालेला हा पुरूष आहे. या अर्थाने ते स्वरपुरूष आहेत. काही माणसंच काळालाही पुढे नेणारी अखंड असतात. सत्ताधाऱ्यांनी मदांध सत्ता काबीज केली— ते नष्टही झाले; पण ज्ञानेश्वरांसारखी माणसं अखंड आहेत.

मी कविता जगतो— जगणाराच आहे. माझ्या देहाचे राईएवढे तुकडे केले तरी मी प्रत्येक तुकड्यातून नव्याने उगवेन, हो, आता परमेश्वरानंच डोळे झाकले, तर कुठलं पाप करणार हो ?'

*'हले काचपात्रातली वेल साधी*
*निनादून घंटा जरा वाकल्या*
*खिळ्यांना कळेना कुठे क्रूस न्यावा*
*प्रभूने अशा पापण्या झाकल्या !'*

मग मला वाट कशी सापडणार ? म्हणून तर मृगजळाच्या हवेचा ऑर्केस्ट्रा शोधतो मी.

*'मी हलेन अश्रूपुरता*
*मी निजेन स्वप्नाकाठी*
*द्रौपदी सजवते चिंधी*
*जशी कृष्ण करंगळीसाठी !'*

मी द्वैती आहे, द्वैती म्हणूनच मरणार.

*'पैलतीरावर*
*विठू माझा भोळा*
*माझी पडशाळा*
*सांभाळते !'*

ती शाळा मला पाहायची आहे.

*'लाटांचे देऊळ असावे*
*जिथे नसाव्या लाटा*
*समुद्र सोडून दूर निघाल्या*
*जळवंतीच्या वाटा !'*

ती वाट मी शोधतोय. माझा विश्वास आहे. संवेदनेवर आधारलेली माणसं शब्दरूपानं काव्याच्या तळाच्या वसाहतीपर्यंत पोहोचतात. त्या वसाहतीचा किनारा खूप महत्त्वाचा आहे. आईन्स्टाईनच्या डोळ्यावरचा चष्मा नाकावर आला तर ठीक आहे पण नाकावरून जमिनीवर



अनुक्रमणिका

पडून तो फुटला तर सापेक्षतावादचा अंत होईल हो ! मेंदूचं काम कसं करणार मग आपण ?'

साहित्याचा सखोल व्यासंग, अंतरंगात खोलवर मारलेली उडी, अर्थगर्भ आशयसमृद्ध रचना, तात्त्विक विवेचन, यातनांचा डोह, यातूनही फुलणारी काव्यातली आंतरिकता हे संपूच नये असं वाटत असतानाच ग्रेस यांनी सूत्रं पंडितजींच्याकडे सोपवली. खरे तर ग्रेस यांनी आपले मुक्तचिंतनातील भाष्य आणि त्यांनी पंडितजींना दिलेली दाद यामुळे श्रोते अंतर्मुखच होते. पुन्हा एकदा पंडितजींनी सूर धरला आणि पंडितजींच्याइतकाच सशक्त आवाजाचा वारसा लाभलेल्या गायिका राधा मंगेशकर यांनीही आपला सूर त्यात मिसळला. कोकणी गीत 'माझे मोगा' आणि आरती प्रभूंचे 'दोन हे आहेत पेले' ही गीते दोघांनीही गायिली. राधा मंगेशकर यांच्या आवाजातील चढ-उतार-गाण्यातली मर्मस्थळं-शब्दांचा अचूक वापर या सगळ्यातून संगीताची एक सूक्ष्म जाणच व्यक्त झाली. 'सूर येती विरून जाती' या शांता शेळकेंच्या गाण्याचीही आठवण पंडितजींनी सांगितली. आणि श्रोते तल्लीन असतानाच ते थांबले. सूत्रे पुन्हा कवी ग्रेस यांच्याकडे ग्रेस बोलू लागले—

'पंडितजींचा स्वर अलौकिक आहे. लतादीदींचाही गळा अलौकिक आहे. लतादीदींच्या स्वराला माझा सलाम आहे.

*'या वाटेवर रघुपति आहे*
*त्या वाटेवर असे शिळा*
*सांग साजणी कुठे ठेवू मी*
*तुझा उमलता गळा !'*

लतादीदीसाठीचे हे माझे शब्दच आहेत. पाऊस, पान, फूल, प्राण, बुद्ध, युद्ध, पक्षी, वाळू, समुद्र, गालिब, व्हिन्सेट व्हॅनगॉग, हे सगळे मला महत्त्वाचे वाटतात. .......... पळसफूल माझ्यादृष्टीनं खूप महत्त्वाचं आहे. भर उन्हाळ्यात पानांचा त्याग करून अंगावर फक्त लालभडक फुलंच घेतं. यासाठीच स्वातंत्र्य महत्त्वाचं. स्वातंत्र्याची आपण इज्जत करायलाच हवी.

*'प्राणांवर चालून आले*
*युद्धातील दिलवर सगळे*
*उल्केसम कोसळणारे*
*नसतात इमानी तारे !'*

अशा इमानी ताऱ्यांची जाणीव महत्त्वाची आहे. पाऊस, दुःख, मृत्यू हे माझे जिव्हाळ्याचे विषय आहेत. या परिसरातला अवेळी कोसळणारा पाऊस मी पाहिलाय. आज कुठे गडप झाला ? पाऊस मला आवडतो, केवळ सांगत नाही मी, लिहिलंयच,

*'पाऊस कधीचा पडतो*
*झाडांची हलती पाने*
*हलकेच जाग मज आली*
*दुःखाच्या मंद सुराने !'*

ही माझी आवडती कविता आहे. अशी एकच कविता माझ्याहातून झाली असती तर मरणानंतरही पंधरा दिवस मी नक्कीच जगलो असतो.

*'पाऊस आला पाऊस आला*
*गारांचा वर्षाव*
*गुरे अडकली रानामध्ये*
*दयाघना तू धाव !'*

ही माझी पावसाची रूपं टिपणारी शक्ती आहे. इतक्या सोप्या भाषेत मी लिहितो तरीही तुम्ही माझी कविता दुर्बोध आहे म्हणता ? ती समजून घ्या- सोपी आहे. माझ्या अनुभवाचा प्रत्येक पदर मी उलगडतो आणि कवितेच्या तरल पातळीवर आणतो. मराठीचं अध्यापन करताना अत्यंत जबाबदारीनं केलं आहे, तसं कविताही जबाबदारीनं लिहिली आहे. आत्मस्वराचा आदेश मी पाळला आहे.

*'फकीराने गोंजारला*
*धुळीतला राजा*
*वेशीपाशी रडू लागे*
*त्याची भोळी प्रजा !'*

किंवा

*'पेटून कशी उजळेना*
*ही शुभ्र फुलांची ज्वाला*
*ताऱ्यांच्या प्रहरापाशी*
*पाऊस असा कोसळला.'.*

ही माझी कवितेची भाषा आहे. ती सरळ-प्रामाणिक आहे. ती दुर्बोध नाहीच नाही. एखाद्याला कविता कळते पण जाणवत नाही, त्याला मी काय करू ? गालिब म्हणतोच– 'चांद दी हुई, उसी की चीज !'

शिवाय मला व्हिन्सेट व्हॅनगॉगची एक गोष्ट आठवते;



अनुक्रमणिका

त्यांनी लिहिलंय, एका वेश्येने कथानायकाकडे कान मागितला, तर त्या नायकानं तिला कान दिला. कारण कान देण्यामागे दुःख आहेच, पण दुःखापेक्षा तिचं समाधान किती मोठं ? ही दुःखाला कवटाळण्याची ताकद असायला हवी. दुःखाशिवाय मला नाही उभं राहता येत !'

असं अखंड बोलून झाल्यावर पुन्हा एकदा सूत्रं पंडितजींच्याकडे दिली. पंडितजींनी आपल्या सुरेल आवाजातून ग्रेसच्या कवितांना रसिकांपर्यंत पोहोचवण्यात महत्त्वाची भूमिका बजावली आहे. पंडितजींनी बोलताना आपले बालपण, सांगलीतले जुने-जीर्ण घर आणि ग्रेसच्या कवितेतले चपखल शब्द यातील भावबंध उलगडला. ग्रेस यांची प्रसिद्ध कविता पंडितजींनी आळवली—

*'घर थकलेले संन्यासी ।*
*हळुहळू भिंतही खचते*
*आईच्या डोळ्यांमधले*
*नक्षत्र मला आठवते !'*

हळूवार संगीत, अर्थपूर्ण भाषा, प्रतिभावंतांची दीर्घ मैत्री, यामधले रसिक चिंब असतानाच पंडितजींनी एका सिंधी गीताने या मुक्तसंवादाच्या मैफलीची, 'ताऱ्यांच्या प्रहरापाशी' या कार्यक्रमाची सांगता झाली.

श्रोत्यांशी मनमोकळा संवाद, दोन अस्सल प्रतिभावंत, एकमेकांविषयीचा क्षणोक्षणी जाणवणारा आदर, दूरच्या शहरात राहून कवितेकडं गांभीर्यानं पाहणारे कवी ग्रेस यांची भेट. सगळंच अवर्णनीय. ग्रेस कवी म्हणून आणि शिक्षककवी म्हणून ग्रेटच. मराठीचे अध्यापक, इंग्रजीवरील प्रभुत्व, स्वतःच्याच अंतरंगात बुडालेला कवी, सोसलेल्या यातना, प्रारब्ध आणि प्रार्थना, 'डिप्रेस्ड' असणं हीच माझ्या जिवंतपणाची निशाणी, असं ठणकावून सांगताना अभिजात काव्यनिर्मिती करणारे ग्रेस. अनुभवसंवेदनांची सूक्ष्म आंदोलनं, प्रतिमांची मांडणी, नवनवे आयाम, कवितेची संगीतानुकूलता, काव्यनिर्मितीचे नीतीशास्त्र उलगडून दाखवणारे ग्रेस सर्वांचेच आकर्षण होते. संत ज्ञानेश्वर-संत तुकाराम-कबीर-व्हिन्सेट व्हॅनगॉग-गालिब-जी. ए. कुलकर्णी-आरती प्रभू-म. द. हातकणंगलेकर या सर्वांविषयीची आदरयुक्त मतं मांडताना आपल्या आयुष्याचंच हे संचित आहे, असं सांगणारे कवी ग्रेस.

अशा प्रतिभावंतांच्या सान्निध्यातली ही अविस्मरणीय संध्याकाळ कवी ग्रेस यांच्या काव्यातली आशय आणि प्रतिमा शोधण्याची उर्मी देणारी ठरली. ग्रेस समजून घेण्यासाठी कवितेतल्या सूक्ष्म संवेदनांची आंदोलनं, वाचता वाचता हरवून जाणारी लय, दुःखसंवेदनेची दाट छटा, आत्मशोधाच्या वाटेवरची आत्ममग्नता या गोष्टी समजून घेण्यासाठी कवितेविषयीचा रियाजच करायला हवा हे नक्की !


**डॉ. चंद्रकांत पोतदार**
यशवंतराव चव्हाण महाविद्यालय,
हलकर्णी, ता. चंदगड,
जि. कोल्हापूर पिन - ४१६ ५५२
दूरभाष - कार्यालय - ०२३२०-२३९०७६
निवास - ०२३२०-२३३१७०
भ्रमणभाष - ९४२३२८६४७९







अनुक्रमणिका

# मीरा तारळेकरांची भावकविता

डॉ. रवींद्र शोभणे



*जमेल तितकी प्राणपणानं*
*जपावीत फुलं-पानंही*
*संध्याकाळी विनातक्रार*
*होऊन जावं काळंभोर*
*सकाळी मात्र उगवावं*
*आपल्याच मातीच्या प्रकाशातून*
*झळझळत राहावं*
*एक नवा जन्म झाल्यासारखं.*

मीरा (तारळेकर) या कवयित्रीच्या कवितेचं हे प्राणतत्त्व. या कवितांना समजून घेताना चटकन् हाती येणारं. या प्राणतत्त्वाची पखरण सर्वत्र या कवितांमधून जाणवते आणि म्हणूनच या कवितेच्या रसास्वादाकडे वळताना या ओळी उद्घृत करण्याचा मोह होतोय्.

गेले दशकभर तरी ही कवयित्री निष्ठेनं काव्यलेखन करीत आहे. लेखनाचा वारसा मातृपरंपरेनं तिला मिळालेला आहे, हे 'माधवी देसाईंची कन्या' या परिचयातून स्पष्ट होते; पण केवळ एवढी एकच ओळख तिच्यावर अन्याय करणारी ठरावी. ती ओळख तशी रक्ताच्या नात्याची. त्यापलीकडची ओळख म्हणजे मीराच्या भावगर्भ आणि चिंतनशील कविता. तिच्या या भावगर्भ आणि चिंतनशील कवितेनं तिची या दशकातील एक सशक्त कवयित्री म्हणून निश्चित अर्थाने ओळख झालेली आहे.

मीराचा पहिला कविता संग्रह 'पुनर्जन्म' १९९९ मध्ये पुस्तक रुपाने प्रकाशित झाला. आणि जाणकारांची या कवितेला पसंतीची पावती मिळाली. त्यानंतर 'वारा आणि कमळ' (२००१), 'आदिमाया' (२००३), 'मुक्ता' (२००३), 'हायकू येतोय्' (२००३), 'ऐक द्रौपदी' (२००५) आणि 'सरहद्द' (२००७) हे स्वतंत्र कविता संग्रह एका पाठोपाठ एक असे प्रकाशित झाले आणि मीराची कविता अधिक ठळक, स्पष्ट, स्वयंभू अशी उभी राहिली. तिला तिचा एक आकार, चेहरा प्राप्त झाला.

नव्वदोतरी मराठी कवितेची वळणं अधिक गतिमान होत गेलीत. मराठी कवितेत रुजलेला आणि रूळलेला स्त्रीवाद एका आवर्तात सापडल्याची स्पष्ट जाणीव होऊ लागली. त्याआधीच्या दलित कवयित्रींचा विचार करावयाचा झाला तर दलितत्व, तत्सम जाणिवा आणि सद्यकालीन भोवताल यात कुठेतरी अंतराय जाणवू लागले. नव्वदनंतर जागतिकीकरणाच्या, मुक्त अर्थव्यवस्थेच्या आणि त्यापाठी उभ्या असलेल्या भांडवलदारी, पर्यायाने भौतिकवादी सुखोपभोगाच्या धडका आपल्या दारावर पडू लागल्या. जग जवळ आलं, माणसाच्या जीवनाच्या कक्षा रुंदावत गेल्या. या जागतिकीकरणाला कुणी थेटपणे सामोरं गेलं तर त्या जागतिकीकरणाला बिचकून, दचकून जाऊन आपल्या वाटांचा शोध घेऊ लागलं. जागतिकीकरणाच्या या सर्वव्यापी कल्लोळात माणूस भौतिकसुखाने समृद्ध होत गेला, तर मनाने मात्र अधिकाधिक रिता, एकाकी होत गेला. माणसं एकमेकांपासून दुरावत गेली. रक्ताच्या, आंतर्हृदयाच्या नात्यांमध्ये कोरडेपणा आला. माणूस अधिक व्यवहारी झाला. आत्यंतिक 'स्वनिष्ठ' झाला. कळत नकळतपणे याचाही पहिला हादरा बसला तो कुटुंबव्यवस्थेला आणि भावजीवनाला. यातून जन्माला आलं एक अनावर दुःख. हे दुःख पाठीवर घेऊन जगण्यापलिकडे दुसरा कुठलाच पर्याय नव्हता. भौतिक

सुखाचा एकीकडे जल्लोश सुरू असताना त्या जल्लोशाच्या कल्लोळात या भोवतालानं जन्माला घातलेलं दुःख मनाला कुरतडत होतं. त्यातून अनेक शारीरिक व्याधींनी आणि आत्महत्यांसारख्या पलायन मार्गाने जन्म घेतला. तथापि हा आतला आवाज, खरा आत्मस्वर आतल्या आतच दबून चिणून जाऊ लागला. बाह्यपरिप्रेक्ष्य कितीही बदलले तरी मानवी दुःखाची, वेदनेची आंतरिक जात ही तर बदलत नाहीच. दुःखाची कारणं बदलतील, त्यावरील उपाययोजनाही बदलतील; पण या दुःखाची वेदना, ठणक ही तर सनातनस्वरुपीच राहणार. हे सनातनत्व शोधण्याचा, त्याच्या परी समजून घेण्याचा कल 'फॅशनेबल' जीवन जाणिवांनी आणि साहित्य जाणिवांनी शबलित केला, असे म्हटले तर त्यात अतिशयोक्ती होणार नाही. हे सनातनत्व शोधताना आपण सद्यकालीन सभोवताल नाकारतो, असे नाही. त्या सभोवतालातच ही दुःखाची मुळ खोलवर गाडलेली असतात. पण या सभोवतालाच्या सोबतीनंच हे सनातनत्वही एका मर्यादित अर्थानं उभं राहतं. त्याच्या परी बदलत जातात. शेवटी चांगल्या कलाकृतीचा स्थायीभाव हा तर मानवी दुःखाच्या मुळांचा शोध घेणं, त्या मुळांनाच शोधणं हा असतो. हे सगळं इथे मांडण्याचा हेतू हाच की मीराची कविता तपासताना, ती समजून घेताना या अंगाने ती अधिक सहजपणे समजून घेता येईल.

मानवी सनातन दुःख, त्या दुःखाने विदीर्ण झालेलं एक हळवं कविमन आणि सभोवतालाच्या अनेकानेक हादऱ्यांनी होणारी पडझड, सावरणं, खचणं, उठणं आणि त्यातून पुढे आपल्या अस्तित्वाला सावरत पुढचा मार्गक्रमण– हे या कवितेचं आशयसूत्र आहे, असं म्हटलं तर ते वावगं ठरू नये.

कलावंताचं– त्यातही कवीचं लौकिक जीवन आणि त्याचे कलाकृतीत– विशेषत्वाने कवितेत पडणारे पडसाद, प्रतिबिंब हे इतर वाङ्मयप्रकारांच्या तुलनेनं अधिक पारदर्शी स्वरूपाचे असतात. कवीचं वैयक्तिक दुःख, त्याची मनोभूमी, मानसिक जडणघडण आणि त्याचा वैचारिक पिंड हे सगळं कवितेत एकपेडीय होऊन येतं, असं साधारणतः अनुमान काढलं तर ते चूक ठरू नये. याला मीराचीही कविता अपवाद नाही. 'पुनर्जन्म' हा तिचा पहिला कवितासंग्रह. यात तर ही शक्यता अधिकच होती. साधारणतः लेखक-कलावंत आपल्या पहिल्यावहिल्या कलाकृतीतून स्वतःला अधिक तीव्रपणे मांडण्याचा प्रयत्न करतो. पुढच्या कलाकृतीतून मात्र मग हा प्रवास व्यक्तिनिष्ठेपासून समष्टीनिष्ठेकडे झुकू पाहतो. आपल्या वैयक्तिक अनुभवाला समष्टीच्या पातळीवर मांडण्याची एक नकळतकृती कलावंताच्या हातून घडत जाते. अर्थात् ही प्रक्रिया कधी कधी पहिल्या कृतीपासूनही सुरू होते, असेही म्हणता येईल. फरक यात एवढाच, की कलावंत आपल्या वैयक्तिक अनुभवांची मांडणी करताना तो त्या अनुभवाला किती व्यक्तिगत ठेवतो आणि किती सार्वत्रिक पातळीवर नेऊन ठेवतो याचा त्याने तटस्थपणे विचार करायला हवा. एखाद्या अनुभवाकडे आपण जेवढ्या तटस्थपणे, दूरस्थपणे पाहू शकू तेवढा तो अनुभव व्यक्तिगततेकडून सार्वत्रिकतेकडे प्रवास करू लागतो. हीच प्रक्रिया मीराच्या 'पुनर्जन्म' पासून सुरू होते, असे अनुमान काढायला हरकत नाही.

'पुनर्जन्म' हे शीर्षक तसे पारंपारिक; पण कवयित्री मात्र या पारंपारिक, रूढ अशा संकल्पनेतून आपला अनुभव मांडण्याचा प्रयत्न करते तेव्हा त्या कवयित्रीच्या भावानुभवाशी हा शब्द हे शीर्षक एक नातं प्रस्थापित करतं. पुनर्जन्म म्हणजे पुन्हा जन्म घेणे. जन्ममृत्यूचं सातत्य आपल्या परंपरेत या अर्थानंही सांगितलं जातं. या शब्दाला आध्यात्मिक असा अर्थ प्राप्त होतो. भारतीय परंपरेत पुन्हा जन्म घेऊन उरलेली कार्यसिद्धी करणे हा अर्थ घेतात. जुना देह टाकून नवा देह स्वीकारणे. या संकल्पनेसोबतच 'फिनिक्स' ही ग्रीक पुराणकथांमधील संकल्पनाही गृहीत धरावी लागेल. राखेतून आपलं अस्तित्व सिद्ध करून हा फिनिक्स पक्षी पुन्हा नव्यानं उभा राहतो. म्हणजे विनाशातून नवनिर्मितीची प्रक्रिया. शेवटी दोन्ही संकल्पना समांतरच आहेत. भारतीय परंपरेत मृत शरीराला अग्नी देतात; आणि पर्यायाने त्याची राख होते. नंतर हाच जीव पुन्हा एखादी नवी कूस शोधून नव्यानं या विश्वात अवतरतो. प्रस्तुत 'पुनर्जन्म' या कवितासंग्रहाच्या संदर्भात या दोन्ही संकल्पना समानधर्मी म्हणून स्वीकाराव्या लागतील.

आयुष्यातल्या कटु, जीवघेण्या अनुभवांनी पोळून निघाल्यानंतर पुन्हा नव्या जिद्दीनं, जिगीरेनं जीवनसन्मुख होणं; आणि या अनुभवांना कधी हळवेपणानं,

भावुकपणानं तर कधी तटस्थपणानं तपासणं, ही या कवितासंग्रहाची प्रकृती आहे.

पुढील ओळी त्या दृष्टीनं तपासून पाहिल्या तर त्या अधिक बोलक्या ठरतील.

*खूप कष्टानं सावरून धरते आयुष्यच*
*मी माझ्या हातात*
*खूप मनापासून जगावं*
*असं काहीच नसतं त्याच्यात...*
*मी जिरवलेल्या असंख्य*
*वादळांचे जहरीले थेंब*
*हृदयात ठिबकत राहतात*
*असह्य होते आहे आता*
*स्वतःलाच स्वतःमध्ये कोंडून ठेवणं* (दुरावा)

ही आहे या कवितेची खरी पृष्ठभूमी. अनुभव प्रदेश. आणि या पृष्ठभूमीवर या सगळ्या भावविश्वाचीच उभारणी झालेली आहे. हाच व्यक्तिगत पातळीवरील सूर कुठे कुठे सार्वत्रिकतेच्या पातळीवरही उतरू पाहतो तेव्हा तो पुढीलप्रमाणे प्रतीत होतो.

*आकाशपृथ्वीमधला सर्व आसमंत जेव्हा*
*झाडापक्ष्यांसकट झोपतो शांत*
*तेव्हा त्या गूढ अंधारात*
*एकटेपण उठून बसतं*
*ज्याच्याबद्दल सांगायला*
*अपुरे असतात शब्द*
*ज्यानं त्यानं आपापलीच*
*सोसायची असतात ही स्पंदनं...*

(एकांत रेषेवर...२)

'पुनर्जन्म' नंतर मीराचा 'वारा आणि कमळ' हा क्रमाने दुसरा कवितासंग्रह २००१ मध्ये प्रकाशित झाला.

तुलनेनं 'पुनर्जन्म' मधली कविता काहीशी संकोचलेली, अंग चोरणारी वाटते, तर 'वारा आणि कमळ' मध्ये ती अधिक मोकळी वाटते. आपला पैस अधिक धुंडाळणारी वाटते. या कवितेत कवयित्रीचं बोल्णं अयशस्वी प्रेमातल्या दुःखार्त नात्याला अधोरेखित करणारं आहे. आपल्या उरातली भळभळती जखम ती पुढील शब्दात मांडू पाहते—

*खरंच, मी सांगणार नाही कोणालाच*
*आकाशाच्या मदीर डोळ्यांविषयी,*
*देहातून पार झालेल्या*
*सप्तसुरांविषयी;*
*विश्वास ठेव*
*मी सांगत राहीन*
*मी बोलत राहीन*
*फक्त माझ्या जखमी कवितांविषयी !*
*कदाचित्*
*दोन किनाऱ्यांच्या अंतराविषयी !*

(विश्वास ठेव)

मीरा इथे आपल्या व्यक्तिगत दुःखापासून, विवक्षित परिघापासून थोडी पुढे येऊन स्त्रीच्या, बाईपणाच्या दुःखाला स्पर्श करू पामते असे जाणवते. 'वेश्या', 'बाई', 'एकटीच', 'आई', 'कहाणी' इत्यादी कवितांमधून हा परीघ असा मोठा होताना दिसतो. आपले वैयक्तिक दुःख आणि स्त्री म्हणून वाट्याला येणारे जन्मदत्त, समाजदत्त दुःख यांचं नातं शोधण्याची प्रक्रिया या कवितांमधून जाणवते.

दुःखाचे, वेदनेचे वाहक असलेले शब्द त्याचे साक्षीदार असतात. शब्दांनीच या वेदनेच्या मूलस्रोताची साक्ष काढतानाही कवयित्री लिहून जाते—

*कविता काय असते ?*
*येण्याच्या आधी कुठे असते ?*
*उमजत नाही.*
*दबलेली स्वप्नं, आठवणी बनतात प्रलयंकारी.*
*रात्र दात विचकत बनते अंधारी*
*छातीतल्या समुद्राला येते भरती*
*डबडबतात खिडकीतल्या*
*नील पक्ष्याचे डोळे*
*त्याचवेळी रक्तातून पळत असतात*
*शब्दांचे थवेच्या थवे,*
*अशाच क्षणी*
*दाटलेल्या हुंदक्यासरशी येते कविता.* (बासरी)
*अशाच क्षणी दाटलेल्या*
*हुंदक्यासारखी येते कविता.* (बासरी)

कवितेचं हे असं मूलगामी नातं सांगताना नकळतपणे ही कवयित्री तमाम स्त्रीजातीविषयी एका उन्नत सुरात 'सूर्य' या कवितेच्या माध्यमातून बोलू पाहते; तेव्हा विस्तारणाऱ्या या परिघाची प्रचीती सहजपणे येते.



अनुक्रमणिका

*वेडी*
*अग, तुझी लढाई काजव्यांशी*
*नव्हतीच कधी*
*लक्षात ठेव*
*तुला अजूनी*
*सूर्य भेटायचा आहे.* (सूर्य)

कवितेतली सूर्यप्रतिमा प्रत्येक प्रकृतिगणिक बदलत असली तरी प्रकाश, ज्ञान, दिव्यत्व, तेज या सूर्याशी संलग्न असलेल्या संकल्पनाच या प्रतिमेतून प्रतीत होतात. आधुनिक कवितेतील आणि पुढे दलित कवितेतील सूर्यप्रतिमांचा धांडोळा घेतला तर त्या प्रतिमांतून उद्धृत होणारा भावार्थ हा असा सहजपणे प्रतीत होतो. महाभारतात सूर्याचा संबंध कुंतीच्या कौमार्याशी आणि कर्णाच्या जन्माशी येतो. कौमार्यावस्थेत सूर्याची उपासना केल्यामुळे कुंतीने कर्णाला जन्म दिला आणि या एका घटनेने कुंती आणि कर्णही दुःखाच्या धगीत आयुष्यभर होरपळत राहिले. हे दुःख त्यांच्या मृत्यूपर्यंत त्यांचा पाठलाग करीत राहील. याअर्थाने तर कवयित्रीला सूर्याशी लढायचं नाही ? आयुष्यभर ज्यानं आपल्याला केवळ दुःखच दिलं, त्याचा सूड तर तिला उगवायचा नाही ? या प्रतिभेतून व्यक्तिगत संदर्भ कालिक पातळीवर गळून पडतात आणि एका व्यापक अर्थाने ही प्रतिमा अधिक बोलकी होऊ लागते.

'आई', 'माळी' या कवितांमधून अपत्य आणि मातेचा एक आदिम ऋणानुबंध मीरा अभिव्यक्त करताना दिसते. प्रसूतीच्या, नवनिर्मितीच्या वेदनांपासून तर आईपासून त्याच्या दूर जाण्याच्या प्रक्रियेपर्यंतचा हा प्रवास मीरा अधिक तन्मयतेने चितारते. यात आई होण्याचं जसं सार्थक आहे, मनाची उन्नतावस्था आहे, तसंच अखेरच्या भागात पुन्हा एकाकी होण्याची दुखरी सलही आहे. मग लेकीच्या डोळ्यातली स्वप्नं पाहणं, ती स्वप्नं जपणं काय आणि आकाशाला भिडणाऱ्या वृक्षासारखा मोठा होणारा आणि अटळपणे दूर जाणारा मुलगा पाहणं या दोहोंतूनही आई असण्याच्या कृतार्थ भावापाठोपाठ पुढील अटळ एकाकीपणही कवयित्री अधिक अर्थपूर्णपणे मांडून जाते.

मीराचा 'आदिमाया' हा तिसरा कवितासंग्रह २००२ मध्ये प्रकाशित झाला आणि या कवितेनं अधिक ठळक, अधिक विस्तारित परिघाला स्पर्श केल्याचं जाणवलं. 'थोडसं माझ्या सावलीबद्दल' या प्रस्तावनावजा कवितेतून मीरा पुन्हा तोच सूर पकडते; पण त्या सुरांची अर्थवलयं मात्र बदलत जातात. आपलं कविपण हे आपलं एकाकीपणच आहे, या एकाकीपणानंच आपल्याला कवितेचा सूर गवसला, दुःखाला शब्दात पकडता आलं, ही समंजस भावना यातून तेवढ्याच प्रांजळपणे व्यक्त होते.

'आदिमाया' तील काही कविता दीर्घतेकडे झुकणाऱ्या आहेत. 'पिंपळाची पाखर' कहाणी; 'माझ्या पाखराच्या कविता' या कविता जशा दीर्घात्म आहेत, तशाच त्या कथात्मही आहेत. यातून सलगपणे एक कथा साकार होताना दिसते.

या कवयित्रीची कविकुलासंबंधी एक रास्त भावना आहे. ती भावना काहीशी स्वाभिमानवजाही म्हणता येईल. कवी केशवसुतांनी 'आम्ही कोण ?' आणि काही तत्सम कविता लिहून कवीचा बाणेदारपणा व्यक्त केला होता. काव्यामागची भावना समजून घ्या असा विनवणीवजा सूर कवयित्री लावते आणि सांगते–

*बापड्या कवींना आपण सगळेच हसतो*
*पण कवितेचा शोध मात्र त्यांनाच लागतो*
*शब्दांचा पत्ता त्यांनाच मिळतो*
*निष्पर्ण वृक्षातळी सुद्धा*
*त्यांच्याच मनाला मोहोर येतो.*

(हसू नका कवींना)

मीरांचं आणि सागराचं एक अतूट नातं आहे. ही कवयित्री जन्माने गोव्यातली. त्यामुळे तिच्या प्रतिभेशी सागराचं नातं नसणं, हे केवळ अशक्य ठरलं असतं. सागर हा एखाद्या आधार देणाऱ्या जिवलगासारखा, आप्तांसारखा स्थिरावला आहे. याची प्रचीती म्हणजे मीरानं आपला पहिलाच कविता संग्रह-पुनर्जन्म हा या सागरालाच अर्पण केलेला आहे. '...त्याच्या-माझ्यात संवाद नव्हता, पण शक्तीचा एक स्रोत त्यानं दिला होता.' अशी कबुली ही कवयित्री या अर्पणपत्रिकेत देते. 'कविता माझ्या सागराच्या' या कवितेत कवयित्री या सागराला जीवलग म्हणून आळवते; तेव्हा हा भाव अधिकच गडद होऊ पाहतो.

*तू नेहमीच असतोस*
*निळाभोर अथांग पसरलेला*



अनुक्रमणिका

*भरतीत उसळणारा*
*ओहोटीत ध्यानस्थ*
*पण आज*
*माझ्यासाठी होशील*
*एकदाच सुंदर प्रियकर*
*आणि घेशील मला जवळ ?*
*एकदाच ?* (कविता माझ्या सागराच्या)

या नात्याच्या पल्याड जाणारं आणखी एक गहिरं असं समुद्राशी सांगणारं नातं व्यक्त होतं. इथे आवेगात हरवलेल्या जीवाला किनारा हवा आहे.

*अथांग दर्यात*
*मस्तीभरी सांतामोनिका*
*सोनेरी फेसात झुलणारी वासना*
*उमलत्या तारुण्याची*
*आणखी एक*
*मावळती संध्याकाळ...* (शोधत किनारा)

तर प्रतीकात्मकरीत्या सुखदुःखाच्या हिंदोळ्यावरचा समुद्र आणखी वेगळाच भेटतो तो असा—

*कालच्या पावसाळी रात्री*
*प्रथमच मला दिसला*
*तुझ्या डोळ्यात एक समुद्र*
*उद्दामपणे*
*आभाळाला भिडलेला*
*अन्*
*नग्न किनाऱ्यावर*
*एका नारळीच्या झाडातून*
*सुखाच्या लाटा पसरलेल्या* (एक समुद्र)

इथे समुद्राचा उद्दामपणा हे जणू पौरूषाचं प्रतीक म्हणून उभं राहतं.

मीराच्या प्रतिभेचा खरा मूलधर्म आहे तो दुःखाच्या अनेक रूपांचा निसर्ग प्रतिमांच्या माध्यमातून शोध घेणे.

*हल्ली,*
*माझ्या काळजातल्याच*
*फुलांच्या जंगलातून मी एकटीच फिरते*
*अगदी क्षमाशील संध्याकाळ बनून*
*फरक इतकाच की*
*माझ्या सोलून निघालेल्या*
*पावलावर ओठ ठेकवून*
*फुलांनीच त्यांची*
*घातलेली असते समजूत*
(पण तू नाही आलास...)

याच मालिकेतला पुढचा कवितासंग्रह आहे 'सरहद्द'. हा कवितासंग्रह २००७ साली प्रकाशित झाला. यापूर्वीच्या तीन कवितासंग्रहांपेक्षा या कवितासंग्रहाचे वेगळेपण म्हणजे ही कविता 'मी'त्वाच्या, व्यष्टीच्या पुढे येऊन स्त्रीत्वाच्या, समष्टीच्या वाटेने व्यक्त होऊ पाहते आहे.

*बाई नुसतेच प्रेम नाही*
*ती आहे उजेडाचे झाड*
*तिच्यातून उडतात प्रकाशाचे पक्षी*
*कधी होते ती आग ्री हरिणी*
*बंड करून उधळते स्वतःशी चौखूर*
*तुझ्यासाठी... फक्त तुझ्यासाठी.*
(मुखपृष्ठावरील ओळी)

अस्तित्त्वाची ग्वाही देणारी आणि परमेश्वरी अस्तित्वाचा आपल्यापरीने अर्थ लावणारी कविताही इथे गवसते. भोगलेपणाच्या एका दीर्घ दुःखात प्रवासानंतरही माणूस विलक्षण जिगीषेने जीवनाला सामोरा जाण्यासाठी धडपडत असतो. जीवनाचं तेच खरं आश्वासक रूप असतं ही समज या कवयित्रीला होते; आणि त्यातूनच मग पुढील ओळी साकारून येतात—

*मग अचानक डहाळी पालवते*
*पराग पाकळ्यातून फुलते*
*सर्वशक्ती एकवटून*
*जगणं येते असे काळोख्या गाभ्यातून*
*हळूच पानाआडच्या काळोखातून*
*कारण ते खूप शहाणं असते आपल्याहून* (जगणं)

हाच अर्थ 'पूल' नावाच्या कवितेतूनही व्यक्त होतो.

*सखी, रडण्यापेक्षा हसूनच साजरं कर दुःख*
*अश्रू पुसणारे हात मिळणार नाहीत*
*आसवांच्या नदीवर पूल मात्र बांधले जातील*
(पूल)

जीवनातली प्रतीक्षा, आतुरता, व्याकुळता, प्रेम, या गोष्टींची पूर्तता कुठे होऊच शकत नाही; उलट यात गुंतून पडल्यामुळे आयुष्य अधिकच दुःखी कष्टी होते; आणि म्हणून या पोळून काढणाऱ्या अनुभवातून तर हे शहाणपण



अनुक्रमणिका

जीवनानं तिच्या पदरात टाकलं नाही ?

स्त्रीचं स्वयंभू होणं हेही या कवितेचं एक अंग आहे.

*त्याच्या आकाशातला*
*एकही तुकडा आपला नाही*
*हे ध्यानात येताच*
*ती परतली आहे गडबडीनं*
*आता तिचं आकाश*
*तीच बांधते आहे*
*ढगांचे खांब रचते आहे*
*सूर्यचंद्राचं तोरण करते आहे*
*ती स्वतःच आता*
*एक आकाश बनते आहे* (आकाश बनते आहे)

हे शहाणपण जसं अनुभवजन्य आहे, तसंच ते काव्यार्थानं विकसनशीलही आहे.

या प्रकृतीच्या कवितेव्यतिरिक्तही मीरा काही वेगळे प्रयोग आपल्या काव्यलेखनातून करताना दिसते. त्यातील एक प्रयोग म्हणजे हायकू या काव्यप्रकाराच्या संदर्भातला आणि दुसरा प्रयोग म्हणजे खंडकाव्याचा. 'हायकू येतोय्' या नावाने मीराचा हायकूंचा संग्रह २००३ मध्ये प्रकाशित झाला. विविध मूड्सचे हायकू यात एकूण दहा भागात विभागलेले आहेत. 'हायकू' हा जपानी काव्यप्रकार. ५, ७, ५ अशा अक्षरमर्यादांच्या बंधनात अडकलेला. शब्दांचा मितव्यय असलेला. मराठीत सुप्रसिद्ध कवयित्री शिरीष पै यांनी हा काव्यप्रकार पहिल्यांदा रुजविला आणि पुढे पुढे तो मराठीतील मोजक्याच कवींनी आपापल्या कुवतीने हाताळला. त्यातली एक कवयित्री म्हणजे मीरा. खुद्द कवयित्रीनेच या कवितासंग्रहाला लिहिलेली अभ्यासपूर्ण प्रस्तावना वाचली म्हणजे तिची या काव्यप्रकाराविषयीची आस्था आणि हुकुमत या दोहोंचाही प्रत्यय येतो.

*वेड्या वृक्षा*
*बहरण्याआधी भोगावी लागते*
*पानगळीची अवस्था...*

हे सनातन सत्य हायकूसारख्या मिताक्षरी रचनेतून व्यक्त होतं.

मीराची प्रकृती ही भारतीय परंपरागत तत्त्वज्ञानाला स्वीकारणारी आहे. भारतीय आध्यात्मिक तत्त्वज्ञानात अद्वैतवादी अशी एक परंपरा आहे. जिवलग, प्रियकर आणि प्रेयसीच्या भावबंधाच्या सुंदर अनुबंध त्यातून व्यक्त होतो. आपल्या श्रेयसाच्या, प्रेयसाच्या अस्तित्वात आपला पूर्णपणे विलोप व्हावा, आपलं असं काहीही उरू नये हा भाव या अशा कवितांमधून व्यक्त होतो.

*माझ्या दारावर टकटक झाली*
*अंगणात माझे आभाळ उभे होते*
*ते पेलताच आले नाही*
*माझ्या दोन हातांना*
*शेवटी करून टाकले*
*हवाली त्याच्यातच स्वतःला.* (माझे आभाळ)

व्यवहारी जगात हे असे अनुभव आलेले असताना, या अनुभवांनी केवळ रितंपण बहाल केल्यावरही मनाच्या आतल्या कप्प्यात ही नवसृजनाची आस कशी तगून आहे, हे या हायकूतून प्रकट होतं.

*आत कोण जागे ?*
*कोणाचे पाऊल वाजे ?*
*या वेणांचा अर्थ उमगेना...* (हायकू येतोय्)

प्रतारणा, वंचना, उपेक्षा वाट्याला आलेली असतानाही हे अनुभव कटु घोटासारखे पचवून नव्या उन्मेषाने, नव्या आशेने उभे राहणे अशा प्रकृतीचे मीराचे हे हायकू आहेत.

मीराच्या आणखी दोन पुस्तकांचा उल्लेख केल्याशिवाय तिच्या कवितेवरील हे विश्लेषण पूर्ण होणार नाही. आणि ही दोन पुस्तकं म्हणजे तिची दोन खंडकाव्य. त्यातले पाहिले- 'मुक्ता' आणि दुसरे 'ऐक द्रौपदी'.

आपल्या या लेखनासंबंधी मीराचं पुढील विधान अतिशय बोलकं आहे. ती म्हणते—

''अन्याय होतोय् याची खात्री पूर्ण पटली की, तो नाही सोसायचा आणि जीवन सुंदर आहे ते भाग्यानेच मिळतं. ते जगायचं. खूप सुंदर जगायचं. ते आपलं आहे; आणि जे आपलं आहे त्यावर कुणीही अन्यायाने प्रहार करायचा नाही. करून नाहीच घ्यायचा हा माझा स्वभाव आणि त्या स्वभावानुसार मिळालेली वेदना मी निष्ठेने प्रामाणिकपणे स्वीकारलेली; आणि या माझ्या आयुष्याच्या पार्श्वभूमीतूनच मी संत मीराबाईकडे आकर्षित झाले असं मला वाटतं.'' (माहेर/दीपावली २००५)



अनुक्रमणिका

भारतीय संत परंपरेतली संत मीराबाई आणि महाभारतातली द्रौपदी या दोन अलौकिक स्त्रियांच्या जीवनावरील 'मुक्ता' आणि 'ऐक द्रौपदी' ही दोन लेखने आहेत. मीरा या लेखनाला खंडकाव्य असे संबोधते. खरे तर खंडकाव्य हा जुना काव्यप्रकार. या जुन्या काव्यप्रकाराचा मोह आधुनिक आणि आधुनिकोत्तर जाणीवा जपणाऱ्या कवयित्रीला का व्हावा, असा प्रश्न पडतो, तेव्हा त्याचे साधे आणि स्वाभाविक असे उत्तर आहे; ते म्हणजे स्त्रीच्या आदिम वेदनेतील समानधर्मीत्व. आजच्या काळाच्या अनुषंगाने विचार केला असता मीरा किंवा द्रौपदी या प्राचीन काळाचे प्रतिनिधित्व करणाऱ्या स्त्रिया आहेत; पण काळ प्राचीन असो की आधुनिक असो, स्त्रीचं दुःख हे सनातन आहे, त्या दुःखाच्या, वेदनेच्या परी समान आहेत.

मीराबाई ही आयुष्यातील सगळे चढउतार, कटु अनुभव विषाच्या प्याल्याप्रमाणे पचवून शांतपणे, समंजसपणे परंपरेला दूर सारत आपल्या प्रेयसाच्या शोधार्थ निघालेली एक विरहिणी आहे तर द्रौपदी ही महाभारतातल्या सूडचक्रामागे उभी असलेली एक धगधगती ज्वाला आहे. जे आपलं ईप्सित आहे, श्रेयस आहे त्याच्या प्राप्तीसाठी दोघींनीही आपल्या आयुष्याची मोठी किंमत दिलेली आहे. एकीनं दैहिक, भौतिक सुखं पायघड्यांसारखी अंथरलेली असतानाही दुःखांच्या, वेदनेच्या आणि शेवटी अपत्यविरहाच्या धगधगत्या ज्वालांमध्ये तिला मृत्यूपर्यंत जळत, होरपळत राहावं लागलं आहे. ही दोन भारतीय पातळीवरची मिथकं काळाची बंधनं झुगारून आधुनिक आणि आधुनिकोत्तर स्त्रियांच्या दुःखाची, वेदनेशी कालातीत अन्वय साधणारी अशी आहेत.

मीराचं 'मुक्ता' हे खंडकाव्य २००३ मध्ये प्रकाशित झालं. अनुरक्ता, विरक्ता आणि मुक्ता अशा तीन भागांमध्ये मीरानं या खंडकाव्याची विभागणी केली आहे. मेडत्याची राजकन्या. राणा रत्नसिंहाची एकुलती एक कन्या. पुढे ती रीतिरिवाजाची बळी म्हणून भोजराजाची पत्नी झाली. पण तिच्या या जीवनप्रवासात एकट्या कृष्णाशिवाय तिच्या जीवनाचं असं कुठलंच लक्ष्य नव्हतं. 'मला विवाह करायचा नाही' असा पवित्रा भर तारुण्यात घेणारी आणि पतिनिधनानंतर 'मी सती जाणार नाही' अशी भूमिका घेणारी ही परंपरेनं जखडलेल्या राजपुतिन्यातली कन्या. या भूमीत लग्नाला विरोध आणि सती जाण्याला विरोध हीच तर प्रचंड बंडखोरी होती; आणि कृष्ण या मूर्त संकल्पनेवर उभ्या आयुष्याचा जुगार मांडणं, ही केवढी बंडखोरी ! केवढा विद्रोह ! केवढं रूढीभंजन ! पण ही या संकल्पनेची प्रणयिनी बनून आयुष्याच्या अंतापर्यंत एकनिष्ठपणे जगत राहिली, हेच या व्यक्तिमत्त्वाचं कालातीत मोठेपण म्हणता येईल.

*एखादे आयुष्य असे नादी असते*
*अप्राप्य गंधाच्या शोधात*
*संकटांचेच बहार झेलते*
*उन्मळलेल्या लाव्ह्यातून*
*एक अग्निरेखा जन्मते.* (मुक्ता)

स्त्रीच्या जन्मदत्त दुःखाचं दुसरं टोक म्हणजे द्रौपदी. अग्निकन्या म्हणून जन्मलेली. देहानं पाचांत विभागलेली; पण तरीही मनाने मात्र कोरड्या किनाऱ्यासारखी














कोरडीठण्ण राहिलेली. पाचांत राहूनही तशी एकटीच जगलेली आणि मृत्यूनंतरही हिमालयाच्या दुर्गम पर्वतरांगात मृतकलेवरानं एकटीच पडून राहिलेली; पण उरात मात्र धगधगती ज्वाला घेऊन स्वतःलाच जाळत राहिलेली. खरं तर द्रौपदी हा एखाद्या महाकाव्याचा विषय. महाकादंबरीचा पैस. भूत-वर्तमानाचा अन्वय सांधणारा. मीरानं तिचीच निवड आपल्या खंडकाव्यासाठी करावी हेही तेवढेच अन्वयार्थक. 'ऐक द्रौपदी' म्हणत मीरा या काळातीत तेजस्विनीशी संवाद साधू पाहते आहे. हा संवाद साधताना ती द्रौपदीलाच सवाल करते—

*सखी,*
*आसवांनी कातळ फुटलाय कधी ?*
*धुमसली तुझ्या जीवाची ठिणगी*
*जगायचं ठरलं आयुष्य आता*
*तहान होऊन फक्त जळती*

(मलपृष्ठावरील ओळी)

'मुक्ता'तील पद्यरचनेचे 'अनुरक्ता', 'विरक्ता' आणि 'मुक्ता' असे तीन भाग मीरा कथेच्या सोयीने पाडते तर 'ऐक द्रौपदी' मध्ये असा दीर्घात्मक अनुबंध न ठेवता सत्तेचाळीस कवितांचा एक काव्यगुच्छच सादर करते. द्रौपदीशी आपला अन्वय लावताना मीरा मनोगतात म्हणते—

*तू आहेस तीनही कालांत*
*गुपित खोल घेऊन गळ्यात*
*पण गीत तुझे घुसमटलेले*
*गाईन मी आता*
*माझ्या सुरात* (मनोगत)

कुठलाही कलावंत समकालात जगत असताना पौराणिक वा ऐतिहासिक कथानकं आपल्या निर्मितीच्या संदर्भात का निवडतो ? हा केवळ 'नॉस्टेल्जिया' असतो का ? हे केवळ परंपरेचं गौरवीकरण वा उदात्तीकरण असतं का ? या प्रकारच्या सर्वसामान्य अशा रंजनप्रधान लेखनाच्या संदर्भात ते काही मर्यादेपर्यंत खरंही असू शकतं; पण गंभीर आणि काही नवं सांगू पाहणाऱ्या या लेखनाला असं बाजूला सारता येणार नाही. एस.एल. भैरप्पांची 'पर्व' काय किंवा गिरीश कर्नाडांची याच प्रकृतीची नाटकं काय, हे साहित्य आपण केवळ ऐतिहासिक वा पौराणिक म्हणून दूर सारू शकत नाही. नवता ही आकाशातून खाली पडत नाही, तर ती परंपरेच्या मातीतूनच जन्माला येते; आणि उन्नतपणे स्थिरावते, म्हणूनच मीरा द्रौपदीच्या संदर्भात म्हणते—

*प्रतीक तू*
*शोषणाचे*
*एका विशाल करुणछायेचे* (महाभारत)

मिथककथांमधून ही प्रतीकात्मकता शोधणं हाच या लेखनाचा खरा मूलधर्म आहे. या मूलधर्माचे उन्नत रूप म्हणजे—

*आता नाही सोसणार*
*असा अन्याय कुणी*
*तुझ्या सोसण्यातून*
*पुनः पुन्हा*
*उभी राहील*
*नव्या स्त्रीची*
*नवी तेजस्वी कहाणी* (बंधमुक्त)

मीराची कविता बहुआयामी आहे. कवितेसंबंधी कवी श्री. मंगेश पाडगावकर यांचे पुढील विधान अधिक बोलके वाटते. श्री. पाडगावकर म्हणतात—

''तुझ्या कविता एकसुरी वाटत नाहीत, त्यात अनुभवांची विविधता जाणवते. ही विविधता हिशेबी हुशारीने वेचलेली नाही : ती माणूस जाणून घेण्याच्या उत्कट कुतूहलातून जन्मली आहे... स्त्रीच्या दुःखांची, एकटेपणाची, अगतिकतेची तीव्र जाणीव तुझ्या कवितेला आहे; पण या जाणिवेची अभिव्यक्ती कुठेही आक्रस्ताळी, स्वतःकडे लक्ष खेचून घेण्यासाठी हिशोबी व्यूह रचणारी असत नाही. या अभिव्यक्तीच्या मागे असलेली तुझी चिंतनशीलता जाणवते...''
(प्रस्तावनावजा पत्र : 'सरहद्द')

**मीरा तारळेकर**
आकाश ४०५, महालक्ष्मी आर्केड, भाग्यनगर - २रा क्रॉस,
बेळगाव - ५९०००६.
दूरभाष : ०८३१-२४८३०३२, भ्रमणभाष : ९८८६५४०७०६

**डॉ. रवींद्र शोभणे**
१६, पंचदीप नगर, वर्धा रोड, नागपूर - २५.
दूरध्वनी : २२९२९५३/९८२२२३०७४३



अनुक्रमणिका

# रामदास फुटाणे यांची चिंतनशील भाष्य-कविता

अंजली कुलकर्णी



सुप्रसिद्ध कवी रामदास फुटाणे हे मुख्यत्वेकरून वात्रटीक, प्रासंगिकाकार म्हणून ओळखले जातात. फुटाणे यांचा बहुतांश वावर हा व्यासपीठावरती असतो. ते लोकांचे, लोकभाषेचे, लोकरचनाकार कवी आहेत. त्यांच्या बोलक्या भाष्य-कवितांमुळे, सर्वसामान्यांमध्ये ते लोकप्रिय आहेत.

परंतु रामदास फुटाणे यांच्या कवितेचे हे पुरेसे मूल्यमापन आहे, असे म्हणता येणार नाही. पृष्ठभागावर विनोदी आणि वात्रट वाटणाऱ्या या कवितांच्या तळाशी समाजाचे एक खोल, गंभीर आणि मूल्यविवेकी चिंतन आहे. त्या तळाचा ठाव तेवढाच जाणतेपणाने, गंभीरपणाने घेण्याची गरज आहे. भारत कधी कधी माझा देश आहे' 'सफेद टोपी लाल बत्ती', 'चांगभलं' आणि 'फोडणी' या चार कवितासंग्रहांमधून फुटाणे यांच्या समग्र कवितेचा असा ठाव घेणे शक्य आहे.

वरवर विदुषकाचा मुखवटा धारण केलेल्या या कवितांपाठीमागे एक मानवतावादी, विकासवादी आणि समाजहितैषी कवीमन दडलेले आहे, याची जाणीव या कवितांमधील विनोदाच्या पल्याड असणाऱ्या कवितागत आशयापर्यंत पोहोचल्यावर होते. वेगवेगळ्या सामाजिक, राजकीय परिस्थितींमध्ये दृग्गोचर होणाऱ्या, माणसांच्या (गैर) वर्तनरीती, विपरीती, विसंगती आणि अधःपतन यांचे दर्शन घडविणे हा या कवितांचा मूळ हेतू आहे. समाजामध्ये पावलोपावली दिसणाऱ्या विसंगतींवर, विसंवादावर, मूल्यहीनतेवर फुटाणे नेमके बोट ठेवतात. त्यांच्या विडंबनाच्या फटकाऱ्यांतून वर्तमान राजकीय परिस्थिती, सर्व पक्षांचे पुढारी, नेते, चित्रपट कलावंत, खेळाडू, शिक्षणमहर्षी, पत्रकार कुणीही सुटलेले नाही. समाजकारण, राजकारण, साहित्य, संस्कृती अशा सर्वच क्षेत्रांमध्ये दिसणारी मूल्यांची पडझड, संवेदनशीलतेचा अभाव आणि मानवताविरोधी कृत्ये यांच्यावर रामदास फुटाणे स्वतःच्या पद्धतीने प्रकाशझोत टाकतात.

जेव्हा समाज आपल्याच दुनियादारीच्या चक्रामध्ये, चाकोरीमध्ये गुरफटलेला असतो. तेव्हा अशा निद्रिस्त समाजाला भोवतालचे भान आणून देणाऱ्या, भोवतालाचे आकलन करून त्यावर भाष्य करणाऱ्या, निद्रेतून जागे करणाऱ्या 'जागणाऱ्या', 'जागवणाऱ्या व्यक्ती'ची गरज असते. प्रत्येक काळामध्ये, समाजामध्ये असे जागणारे आणि जागवणारे निर्माण होत आले आहेत.

समकालीन वास्तवाचे यथायोग्य निरीक्षण, आकलन आणि भान हे अशा जागत्यांचे वैशिष्ट्य राहिलेले आहे. समाजाचे काहीतरी बिघडले आहे हे प्रत्येकाला समजत असतेच. परंतु नेमके कुठे बिघडले आहे ती जागा बरोबर चिमटीत पकडून, उचलून दाखविण्याचे काम रामदास फुटाणे केवळ चारपाच ठासेबंद ओळींमध्ये करतात. त्यासाठी, समाजमानसावर सत्ता गाजवणाऱ्या राज्यकर्त्यांवर कोरडे ओढण्याइतके धैर्य रामदास फुटाणे यांच्याजवळ आहे. मात्र तसे करताना त्यांनी स्वीकारलेला मार्ग कठोर ताडनाचा नाही तर त्यासाठी त्यांनी उपहास, व्यंग्य, विनोदाच्या विविध छटा यांचे उपयोजन केले आहे. प्रसिद्ध समीक्षक प्रा. रा. ग. जाधव यांनी फुटाणे यांना 'सांस्कृतिक भाष्यकार' म्हटले आहे ते रास्तच आहे; असे त्यांचे संग्रह वाचल्यावर वाटल्यावाचून रहात नाही.

*मुलाच्या शाळेतील प्रवेशासाठी*
*आईने सोळा सोमवार केले*

*बापाने सोळा शनिवार केले*
*चिरंजीवाला सोबत घेऊन*
*दोघेही शाळेत गेले !*
*बापाच्या खिशाकडे बघत*
*प्रिन्सिपॉल हसला*
*नोटा देताच*
*पोरगा वर्गात बसला !*

असे जेव्हा रामदास फुटाणे लिहितात तेव्हा त्यातील विनोदाच्या पाठीमागे भेदक भ्रष्टाचारी वास्तव आणि त्याविषयीची चीडच असते.

खरे तर राजकीय, सामाजिक घटना किंवा व्यक्ती यांच्यातील विसंगतींच्या दर्शनासाठी विनोद, व्यंग्य किंवा उपहास याच्या सारखे दुसरे प्रभावी हत्यार नाही. माणसातील अनिष्ट प्रवृत्तींचे व्यंगात्मक चित्रण करण्याची परंपरा आपल्याकडे पहिल्यापासून आहे. संतसाहित्यामध्ये देखील याचे दाखले सापडतात. उदा.

*'घरी कामधेनू पुढे ताक मागे ।*
*हरीबोध सांडूनि वेवाद लागे ॥'*

असा उपहास संत रामदासांच्या लिखाणात सापडतो. एकनाथांनी भारुडांमधून विनोदाचाच आश्रय घेतलेला दिसतो. संत ज्ञानेश्वर, तुकारामांपासून अनेक संतांच्या रचनांमध्ये विनोदाचा अंगिकार केलेला आढळतो. किंबहुना व्यंगात्मक भाष्य हे लोकभाषेचेच एक अंग आहे, असे म्हटले तर चूक ठरणार नाही. ग्रामीण भागामध्ये, चावडीवरील गप्पा हा अशा व्यंगात्मक भाषेचा उत्तम नमुना म्हणता येईल. आधुनिक काळातही साहित्य, व्यंगचित्रे यांच्या माध्यमातून समकालीन वास्तवातील विरुपांचे दर्शन घडवले गेले आहे. रामदास फुटाणे हे आपल्या कवितेचे आशयद्रव्य जनमानसातूनच निवडताना दिसतात. जनमानसाच्या दृष्टिकोनातून ते त्या-त्या पुढाऱ्याकडे, नेत्याकडे, 'हीरो-हिरॉईन'कडे किंवा घटनेकडे पाहतात. आर. के. लक्ष्मण यांच्या व्यंगचित्रांमध्ये जसा एक 'कॉमन मॅन' सर्व परिस्थितीवर 'लेमॅन्स अँगल'(layman's angle) मधून भाष्य करीत असतो त्याप्रमाणे फुटाण्यांच्या कवितेमध्ये एक 'सर्वसामान्यांचा प्रतिनिधी' दडलेला असतो. लोकांच्या मनातील विविध प्रतिक्रियांचाच तो उद्गार असतो. रामदास फुटाण्यांना लाभलेल्या लोकप्रियतेचे ते एक प्रमुख गमक आहे. त्यांच्या कवितेला लोकाभिमुखता (मास-अपील) आहे ते त्यामुळेच !

स्वतः फुटाणे दत्तु बांदेकर, आचार्य अत्रे यांचा वारसा सांगतात. फुटाण्यांच्या आधीच्या काळात मंगेश पाडगावकरांच्या उपहासिका आलेल्या आहेत. परंतु या तिघांपेक्षाही रामदास फुटाण्यांच्या कवितेची प्रकृती वेगळी आहे. भाषा, शैली आणि आकृतिबंधाचा विचार केला तर रामदास फुटाणे यांचा बाज तिघांहूनही वेगळा आहे. मराठीत तसा यापूर्वी आलेला नाही म्हणून तो स्वतंत्र, फुटाणे यांचा स्वतःचा आहे. कवितेच्या रूढ आकृतिबंधाच्या पलीकडे जाणारा एक वेगळा आकृतिबंध रामदास फुटाणे यांनी निर्माण केला आहे. बहुतेक वेळा तो संवादाच्या, बोलीभाषेच्या अंगाने येतो. शब्दांचे कोटीक्रमात्मक उपयोजन किंवा शब्दांची, नावांची विशिष्ट पद्धतीने फोड करून त्याला विशिष्ट अर्थ प्राप्त करून देणे हा श्लिष्ट प्रकारही मराठी कवितेत वेगळेपणाने प्रथमच आलेला आहे.

सामाजिक, राजकीय विरूपतेविषयी बोलताना फुटाणे बहुतेकवेळा केवळ निर्देशनाच्या पातळीवर थांबतात. 'कसे आहे' हे ते सांगतात; मात्र 'कसे हवे' हे सांगत नाहीत. एक व्यवस्था मोडीत काढली तर दुसरी पर्यायी व्यवस्था देण्याची जबाबदारी ती मोडणाऱ्यावर असते.

जेव्हा एखाद्या घटनेवर किंवा व्यक्तीच्या विसंगत, विघातक वा अमानवतावादी कृतीवर फुटाणे बोट ठेवतात; तेव्हा त्या घटनेकडून किंवा व्यक्तीकडून त्यांना मानवतावादी कृतीच अपेक्षित असते. म्हणूनच ते त्याची विनोदातून हेटाळणी करतात, ही बाब सूक्ष्म पातळीवर समजून घेण्याची आहे. मुळात रामदास फुटाणे यांचा मानवी जीवनमूल्यांवर विश्वास आहे, म्हणूनच मूल्यभंगाची क्लेशकारक जाणीव ते कवितेतून व्यक्त करतात,

'कृष्णा'पासून 'श्रीकृष्णा'पर्यंत
*कुणीकुणाला पेटवावे—*
*'खिशा'तच अडता खोरे*
*'पाणी' कुणी अडवावे ।*

असे ते म्हणतात, तेव्हा या सगळ्यांपाठीमागच्या भ्रष्ट राजकारणाची चीडच ते व्यक्त करतात. संवेदनशील माणसाची चांगल्या समाजाबद्दलची जी अपेक्षा असते; तीच अपेक्षा रामदास फुटाणे यांच्या विनोदाच्या तळाशी





अनुक्रमणिका

असते.

बहुतांश वेळा, फुटाणेंच्या कवितेचे विशिष्ट सामाजिक/राजकीय घटना किंवा व्यक्ती या आशयकेंद्र बनतात. कालांतराने ती व्यक्ती/घटना इतिहासाचा भाग बनते, संदर्भ जुने, शिळे होतात. अनुभवातून ताजेपणाचा गंध विखरून जातो, असे म्हटले जाते. परंतु इथे एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे की, फुटाणे यांच्या कवितेत येणारी व्यक्ती वा घटना ही त्या-त्या स्वभाववृत्तीच्या निदर्शक म्हणून येत असते. त्या अर्थाने ती सार्वकालिक मानवी प्रवृत्तींचेच प्रातिनिधिक चित्रण करीत असते.

*'प्राध्यापकांनी पेपर फोडले*
*मंत्र्यांनी मार्क्स खोडले*
*जेलरने कैदी सोडले*
*आम्ही डोळे झाकून*
*कोपरापासून हात जोडले'*
*किंवा*
*'पाटलाचं घोडं*
*हेलपाट्यानं दमलं*
*बँडवाल्याला वाटलं*
*लग्न आपल्यामुळेच जमलं'*

या सारख्या कवितांमध्ये विशिष्ट घटना अभिप्रेत असली तरी कालांतराने त्यातील व्यक्ती वा घटनाविशिष्टता लोप पावते; आणि ती त्या वृत्तीचे प्रातिनिधिक सामान्य रुप ठरते. फुटाण्यांच्या कवितेतही अशी काही सामान्यरुपे आढळतात. या अर्थाने फुटाणे यांच्या कविता केवळ प्रासंगिक न राहता त्या वृत्ती-निदर्शक ठरतात, मानवी वर्तनाचा वेध घेणाऱ्या ठरतात.

यामध्ये एक अडचण निर्माण होऊ शकते, ती जुने राजकीय/सामाजिक/सांस्कृतिक संदर्भ माहीत नसण्याची. ते संदर्भ माहीत नसतील तर विनोदातील चिमटा (पंच) कळणार नाही. परंतु वाचकाला वर्ण्य विषयाचा संदर्भ माहीत नसणे, हा कवीदोष होऊ शकत नाही. रामदास फुटाणे या व्यक्तीच्या व्यक्तिगत जीवनातील घटना/व्यक्तींचे संदर्भ त्यांच्या कवितांमधून येत नसून, सार्वजनिक जीवनातील प्रसिद्ध व्यक्ती व घटना यांचेच संदर्भ त्यात असतात. ते माहिती करून घेणे ही अंतिमतः वाचकाची जबाबदारी ठरते. दि. पु. चित्र्यांच्या कवितांमध्ये रोमन, ग्रीक मिथकांचे संदर्भ येतात. ती मिथके वा त्यांचे अर्थ माहिती नसतील तर ती कविता दुर्बोध वाटते. परंतु हा दोष दि. पु. चित्र्यांच्या नाही. उदा. 'सिसिफस'चे मिथक माहिती नसेल तर 'सिसिफसलेला' या शब्दामागील नियतीशरणता समजणे अवघड आहे. इथे वाचकांनीच आपल्या जाणीवेचा पैस वाढवून, मिथके समजून घ्यावीत आणि त्या वाढीव जाणीवेच्या प्रकाशात, कवितेचा आस्वाद/आकलन करून घ्यावे, दुर्बोधतेचा शिक्का मारून कवितेला निकालात काढू नये, अशी अपेक्षा करणे गैर ठरणार नाही.

परंतु इथे मुद्दा दुर्बोधतेचा नाही. फुटाणे यांची शैली दुर्बोध तर नाहीच, उलट ती लोकभाषा आहे. सर्वसामान्य लोकांना, समजेल, आवडेल, रुचेल अशा लोकभाषेत फुटाणे लिहितात. प्रश्न फक्त संदर्भ समजून घेण्याचा आहे.

एकूणच रामदास फुटाणे यांची भाष्य-कविता नेहमीच्या कवितेपेक्षा वेगळी आहे. त्यासाठी मूल्यमापनाची वेगळी पट्टी आणि दृष्टी हवी.

अंजली कुलकर्णी
३, विघ्नहर अपार्टमेंट, जयवर्धमान सोसायटी,
बिबवेवाडी रस्ता, पुणे - ४११ ०३७.
दूरभाष : २४२१५४८३, भ्रमणभाष : ९९२२०७२१५८

संदीप खरे यांची मुलाखत

# 'कवितेचे कवितापण संपू नये'

स्वाती महाळंक



मराठी मनांवर फार पूर्वीपासून कवितेची मधुर मोहिनी आहे. कवितेच्या स्पर्शानं मराठी मन मोहोरतं. मनातल्या भावभावना शब्दरूप घेऊन कवितेत प्रतिबिंबित होतात; आणि त्या कविता वाचताना कित्येकजण पुन्हा आपल्या मनाचं प्रतिबिंब त्यात शोधत राहतात, हीच कवितेची खरी जादू आहे. कवितेची ही जादू अधिक प्रभावीपणे रसिकांपर्यंत पोहोचली ती जाहीर काव्यवाचन किंवा काव्यगायनामुळं ! कवी यशवंत, सोपानदेव चौधरी, बा. भ. बोरकर यांच्या काव्यगायनावर, सादरीकरणावर मराठी माणसानं भरभरून प्रेम केलं. सुरेश भटांच्या किंचित् जाड्याभरड्या वाटणाऱ्या, खर्जातल्या आवाजातील काव्यगायनालाही मनमोकळी दाद दिली. पुढे मंगेश पाडगावकर, वसंत बापट, विंदा करंदीकरांच्या कार्यक्रमांनी महाराष्ट्राला वेड लावलं. कविता नुसती वाचण्यापेक्षा ती सादर केली तर सर्वसामान्य रसिकांपर्यंत ती अधिक प्रभावीपणे पोहोचते हे यामधून वारंवार सिद्ध होत गेलं.

अलीकडच्या काळात असे कार्यक्रम सरसकट होत नसले तरी गेल्या दोन-चार वर्षात एका कार्यक्रमानं अनेकांचं लक्ष पुन्हा एकदा वेधून घेतलं, ते म्हणजे संदीप खरेचा 'आयुष्यावर बोलू काही' हा कार्यक्रम. आपल्या कवितांवरचा, संगीतकार मित्र सलील कुलकर्णी यांच्या साथीनं, संदीपनं उभा केलेला हा कार्यक्रम अल्पावधीतच प्रचंड लोकप्रिय झाला; आणि व्यावसायिकदृष्ट्याही यशस्वी ठरला. त्या पार्श्वभूमीवर या कार्यक्रमाच्या अनुषंगानं संदीपनं कवितेच्या सादरीकरणाबाबत काय आणि कसा विचार केला, याविषयी त्याच्याशी मनमोकळ्या गप्पा झाल्या.

'आयुष्यावर बोलू काही' हा संदीपचा कार्यक्रम गेली चार वर्षे सुरू आहे. प्रारंभापासूनची त्याची लोकप्रियता आजतागायत कायम आहे. संदीप म्हणाला, "कवितावाचन ही गोष्ट मला नवीन नाही. लहानपणापासून मी ते करीत आलो आहे. या कार्यक्रमात कवितांचं सादरीकरण करायचं ठरवलं तेव्हा त्यामुळेच त्यात कठीण असं काही वाटलं नाही. आजही कविता-वाचनाचं माझं तत्त्व तेच आहे. तेव्हा वाचायचो तसाच आजही वाचतो. फक्त सवयीनं आता त्यात अधिक सफाई आली आहे. खरं तर कवी एखाद्या उत्स्फूर्त क्षणी कविता लिहून मोकळा होतो. आणि वाचक तितक्याच सहजपणे कवीवर शिक्का मारून मोकळे होतात. सुधीर मोघे, बा. भ. बोरकर यांसारखे कवी मला 'एक्स्प्रेशनिस्ट' वाटतात. त्यांचं तसं असणं हेच सर्वांत महत्त्वाचं आहे. त्यामुळेच त्यांच्या कविता मोठ्या प्रमाणात लोकांपर्यंत पोहोचल्या. जे व्यक्त करायचंय ते उपलब्ध सर्व साधनं वापरली तर अधिक प्रभावीपणे पोहोचतं याची खात्री पटत गेल्यामुळे अशा कार्यक्रमाच्या स्वरुपात सादरीकरणाची कल्पना सुचली."

कवितेच्या अंतरंगात डोकावताना संदीपचं भावुकपण जसं जागं असतं तितकंच जागं असतं तिच्या जातकुळीचं भानही ! त्याच्या मते प्रत्येक कवितेची जागा स्वतंत्र असते. पुस्तकाच्या पानावर एखादी खुलून दिसते; तर एखादी फक्त स्टेजवरच शोभते. काही कविता चाल घेऊन येतात त्या सादर केल्या तर आपोआप दाद मिळवून जातात. काही कविता अशा असतात की शांतपणे आपण आपल्या वाचत त्यांचा आनंद घ्यावा. पण कवितेची ही जात ओळखता यायला हवी. आणि

स्टेजवर सादरीकरणाचा विचार करताना याचं भानही ठेवायला हवं. पण त्याचबरोबर असे कार्यक्रम सादर करताना त्या पाठोपाठ येणाऱ्या जबाबदारीची जाणीवही संदीपला आहे. तो म्हणतो, "लोकांना साहित्याची आवड असते. कवितेवर प्रेम असतं. पण काही वेळा वाचयायला पुरेसा वेळ नसतो. काहीवेळा नेमकं काय वाचावं हे उमजत नाही. अशा वेळी, आपण अशा लोकांना कवितेपर्यंतचा प्रवास सोपा करून दिला पाहिजे. त्यासाठी सादरीकरणही प्रभावी हवं. कवितेचा आत्मा काय आहे, तिला काय म्हणायचंय हे समजायला हवं. त्याच्यानुसार तुमच्या आवाजातील चढउतार, सादरीकरण असायला हवं. काव्यवाचन आणि नाट्यवाचन यात माझ्या मते अगदी किंचितसा, नाजूक फरक आहे. तुम्ही कविता जराशी जास्त हळुवारपणे वाचलीत की ती नाटकी होते. ती जशी आतून येते तशी सादर करावी, हे भान मी पाळतो. मला सुरुवातीपासून संगीताची आवड आहे, अभिनयात रुचि आहे. त्याचा या प्रयोगासाठी आपोआप उपयोग झाला."

सकस लेखन करणं हे जसं आव्हान आहे तसंच ते तितक्याच ताकदीनं लोकांपर्यंत पोहोचवणं हेही आव्हान आहे, याची जाणीव संदीपला आहे. त्यामुळे कार्यक्रमासाठी कवितांची निवड करताना त्यानं प्रारंभी तंत्र समजून घेण्यावर भर दिला. त्याचा अभ्यास केला. आणि त्याला अनुरूप ठरणाऱ्या कवितांचीच निवड केली. कवितांना पूर्णपणे न्याय मिळाला पाहिजे याबाबत तो आग्रही आहे. कवितांची बालपणापासून आवड असलेल्या संदीपनं प्रारंभी 'कॅलिडोस्कोप' हा कवितांचा कार्यक्रम केला. त्याचे सुमारे दोनशे प्रयोग झाले. पुढे त्यानं आणि त्याचा संगीतकार मित्र सलील कुलकर्णी यांनी एकत्र काम सुरू केल्यावर त्यांची 'दिवस असे की...' ही कॅसेट प्रसिद्ध झाली. तिला भरपूर लोकप्रियता मिळाली. त्यातून 'आयुष्यावर बोलू काही...' या कार्यक्रमाच्या उभारणीला चालना मिळाली. कार्यक्रम करायचा तर आपणच करू आणि तो अगदी गप्पांसारखा अनौपचारिक करू ही या दोघांही मित्रांची मुळातली अटकळ होती. त्यामुळे तो कार्यक्रम तसाच उभा राहिला, आणि लोकांच्या पसंतीला उतरला. सारं सादरीकरण सहज-स्वाभाविक असल्यानं ते लोकांच्या थेट मनाला भिडलं. आता या मनमोकळ्या संवादात प्रेक्षकही सहभागी होतात.

हा कार्यक्रम उभा करताना मनावर पूर्वसुरींचे घट्ट संस्कार होते; हे संदीप नाकारत नाही. तो म्हणतो, "प्रत्येकाच्या मनावर असे संस्कार असतातच. आपल्याला त्यातलं नेमकं काय अपील होतं हे महत्त्वाचं. विंदा, पाडगावकर, सुरेश भट, शंकर वैद्य हे सगळेजण ताकदीनं कविता सादर करतात. पण आपापल्या 'स्टाईल'शी प्रामाणिक राहून त्या पोहोचवतात. विंदांची पद्धत रोखठोक आहे. पाडगावकर रंगवून रंगवून कविता म्हणतात. प्रत्येकाची स्वतंत्र शैली आहे. ते संस्कार मनावर होतेच पण म्हणूनच हे ठामपणानं ठरवलं होतं की आपल्याला आपली स्वतंत्र 'स्टाईल' हवी. कुणाच्याही प्रभावाखाली आपला कार्यक्रम असता कामा नये."

कविता गाण्याच्या स्वरुपात असली तर ती अधिक चांगल्या रीतीनं प्रेक्षकांपर्यंत पोहोचते, असा ठाम विश्वास असल्यानं 'आयुष्यावर बोलू काही' हा प्रयोग












उभा करताना संगीताची मदत घ्यायची असं संदीपनं ठरवलं होतं. 'दिवस असेकी...' या कॅसेटला दहा वर्ष होत आली होती. त्यातल्या बहुतेक कविता या चालीसकट आल्या होत्या. सलीलचं नि त्याचं 'ट्यूनिंग' चांगलं जमलं होतं. कविता मुळात अर्थपूर्ण असल्या तरी संगीताच्या साथीनं त्याचं वेगळ्या प्रकारानी सादरीकरण करता येतं यावर दोघांचंही एकमत होतं. त्यामुळे संगीत हा या कार्यक्रमातला अविभाज्य घटक बनला. संदीप म्हणतो, "आयुष्यावर बोलू काही... चा पहिला प्रयोग आणि साडेचारशेवा प्रयोग या दोन्हीत तसा अजिबात फरक नाही. तो तेव्हा जितका मन ओतून करायचो तेवढाच आजही करतो. त्याचं खरं सौंदर्य त्याच्या 'फॉर्म'मध्ये म्हणजे आकृतिबंधात आहे. पारावरच्या गप्पांच्या स्वरूपात हा कार्यक्रम होतो. आम्हालाही तो सादर करताना गंमत वाटते. वेशभूषा, रंगभूषा, सेट कसलीही भानगड नाही. सगळं पाच मिनिटात तयार होतं. पण त्यामुळेच एक जबाबदारी वाढते. आजुबाजूला सगळं इतकं साधंसुधं असतं की आपोआप लक्ष तुम्ही काय बोलता यावर केंद्रित होतं. त्यामुळे सादरीकरणाबाबत अधिक जागरूक राहिलो. खरं तर कार्यक्रम कसा बांधायचा हे अगदी काटेकोरपणे ठरवलेलं नव्हतं. कविता ठरवल्या, साधारण मध्ये काय बोलायचं याची 'आऊट लाईन' ठरवली होती. पण एक विशिष्ट संहिता वैगरे काही तयार केली नाही. पण तो 'फॉर्म' 'क्लिक' झाला. खरं सांगायचं तर आम्हालाही तो 'फॉर्म' सापडला असं म्हणावं लागेल. त्याच्यामुळे काव्यात्मतेमध्ये बाधा न येता प्रेक्षक रसास्वाद घेऊ शकतात."

हा कार्यक्रम यशस्वी होत गेला तसं स्वरूप तेच ठेवलं तरी काही बदल संदीप करत गेला. सामाजिक, वास्तववादी कवितांचा त्यात समावेश झाला. नंतर तर सहा तासांचा सलग प्रयोगही सादर केला; आणि त्यालाही भरभरून प्रतिसाद मिळाला. पण या सगळ्यामध्ये रंजनाच्या पलीकडे जाऊन कविता म्हणून ती रसिकांपर्यंत पोहोचावी अशी संदीपची तळमळ आहे, कटाक्षही आहे. तो म्हणतो, "कवितांचा कार्यक्रम तोही संगीताच्या साथीनं, असं असलं तरी ते केवळ मनोरंजनापुरतं नाही. रंजन हा त्याचा एक हेतू निश्चित आहे पण तोच एकमेव नाही हे लक्षात आहे. म्हणूनच ज्यामध्ये कवितापण नाही, अशा कविता सादर करायला धजावत नाही. वसंत बापट म्हणायचे, 'कवीला शैली असू नये.' मला ते पटतं. माणूस एखाद्या विशिष्ट मूडमध्ये असेल तर तशी कविता सुचते. म्हणून तो माणूस कायमस्वरुपी त्या वृत्तीचा कवी होत नाही. पण जे काही लिहिताय ते प्रामाणिकपणे लिहिता का, हे महत्त्वाचं ! त्यामुळेच माझ्या कार्यक्रमात मी वेगवेगळ्या मूडस्च्या कवितांचा समावेश केलेला आहे. हे विषयांचं वैविध्य लोकांना आकृष्ट करतं. त्यांना कवितेच्या अधिक जवळ घेऊन जायला मदत करतं."

'कवितेचं कवितापण संपू नये' याद्दष्टीने हा प्रामाणिक प्रयत्न आहे. संदीप म्हणतो, "कवितेचा अभ्यास करावा, तिची जातकुळी ओळखावी नि मग ती सादर करावी. ती उत्तमपणे श्रोत्यांपर्यंत पोहोचते. आता कार्यक्रम ऐकल्यावर मुले मला सांगतात, आमच्या मनातली कवितेबद्दलची भीती गेली. आता ती मुलं आपणहून कविता वाचायला लागली. हे गृहीत धरलं पाहिजे. रंगमंचीय कवितेला, सादरीकरणाच्या दृष्टिकोनातून लिहिल्या जाणाऱ्या कवितेला माझा विरोध आहे. प्रत्येक कलेची एक व्यक्तिगत भाषा असते. ती नव्या पिढीपर्यंत पोहोचण्यासाठी अभिसरण व्हावं लागतं. संकल्पना सुरुवातीपासून कळत, स्पष्ट होत गेल्या की त्या कलेशी मुलांची लवकर जवळीक होते. कवितेशी युवापिढीची जवळीक साधून देण्यासाठी माझा प्रयोग उपयुक्त ठरला, असं अनेकांचं मत आहे."

अशा गोष्टीसाठी, त्या प्रभावीपणे पोहोचाव्यात म्हणून आवश्यक तेवढा तंत्राचा वापर संदीपला योग्य वाटतो. पण मुळात कविता सकस असणं सर्वांत महत्त्वाचं. कवितेबाबतची हीच निष्ठाच त्याचं सादरीकरणही यशस्वी करत असेल, यात शंका नाही.

**स्वाती महाळंक**
प्लॉट नं. २३, गिरीजाशंकर सोसायटी, धनकवडी, पुणे ४३.



अनुक्रमणिका

□

परीक्षण

# 'चिगूर' नंतरची कविता – आशयसंपन्न निगूढ काव्यानुभव

□

प्रा. डॉ. पंडितराव पवार

'चिगुर' नंतरच्या कविता हा शिवाजी नामगवळींचा 'चिगूर' या काव्यसंग्रहानंतरचा दुसरा कवितासंग्रह नुकताच वाचला. श्री. सिद्धेश्वर नामगवळी यांनी 'चिगूर' प्रकाशनाच्या वतीने हा कवितासंग्रह २००७ मध्ये प्रकाशित केला.

'कवी तो होता कसा आननी' अशी रसिकांची कवीला पाहण्याची इच्छा असली तरी, कवीचे व्यक्तिमत्त्व, त्यांचा व्यवसाय, वय आणि लिंग इत्यादी बाबींचा खरेतर फारसा संबंध नाही. आत्मप्रत्ययाच्या ऊर्मीतील प्रकट झालेली कविता ही प्रामाणिक आणि म्हणून अस्सल असते. प्रतिभेचे वरदान आणि प्रखर दाहक अनुभवाची जोड हीच शाश्वत कवितेची खरी कसोटी असते. त्यामुळेच कोणताही कवी स्वप्ने पहात असला तरी, अनुभवाला मूर्त करण्यापुरताच त्या स्वप्नमयी जगाचा उपयोग होतो. म्हणूनच निव्वळ स्वप्नरंजनातून निर्माण होणाऱ्या कलेपेक्षा वास्तवाची दाहकता असणारी निर्मिती ही वाचकांना अधिक भावते; आणि म्हणून ती अक्षरही असते. श्री. नामगवळींच्या या निर्मितीबद्दल असेच म्हणावेसे वाटते. आपले अनुभव प्रकट करणे, ते विस्कळीत करून पुन्हा पुन्हा त्यांना नवनवी रूपे देणे, हे खऱ्या कलावंताचे लक्षण श्री. नामगवळींच्या या कवितेतून ठळकपणे जाणवते.

ह्या कवितेतील कविता एकेका सलग अनुभवाचे मूर्तीकरण करते. भावगीतासारखे वेगवेगळे भाव कवितेतून व्यक्त करण्यापेक्षा एकच सुखदुःखाचा सखोल भाव, अनुभव अत्यंत गहिरेपणाने या कवितेतून प्रकर्षाने व्यक्त होतो. घनदाट जंगलाचे, कोसळणाऱ्या पाऊस व भोळ्या उन्हाचे, वल्यामधल्या धुक्याचे, लाटांचे आणि सुरकुतलेल्या काजळमायेच्या संध्याकाळचे अशा आदिम निसर्गाचे चित्रण या कवितेत येते. हा निसर्गाचा आविष्कार कवीला स्वतःला निसर्गाचाच अंश असल्याचा क्षणोक्षणी प्रत्यय आणून देतो. स्वतःचे गहन, गूढ, गंभीर अनुभव कवी निसर्गाच्या विविध रूपांशी जोडू पाहतो, तर कधी त्यापासून फटकून वागण्याचा प्रयत्न करतो. ही घुसमटही कवी अशी व्यक्त करतो...

*'यातून सुटावे म्हणून... पण*
*पाहतो स्वतःला असहाय*
*गुंतत गेलेला, गुंता झालेला,*
*म्हणजे यातून सुटका नाही.'* ('मरण')

हाच अनुभव शेवटी कवी सजगतेने अखेरीस व्यक्त करतो.

ह्या कवितेतील जीवनसंघर्षातील सलणाऱ्या व्यथा, किंवा चैताचे चैतन्य शोधण्याचा, नवेपणाचा आशावाद हे एक चक्र-आवर्त यांची किमया अशी गहन रूपात व्यक्त होते. कवितेतील अनुभव हाच कवीच्या अस्तित्वाची जागा घेऊन 'चकवा भरल्यागत रस्ता तुडवीत' हेलपाटे मारतो; आणि मनाचे 'कोंबकोवळे हेतू' पुन्हा सजग होतात. 'प्रकाशातलं सुख अभ्रकात टाचूनही' त्याचा शोध आणि हव्यास वाढतच राहतो.

खरे तर 'प्रकृती' या त्यांच्या कवितेतून त्यांच्या सर्वच कवितेचा पाठशिवणीचा आणि परंपरेचे भान असणारा प्रवास प्रकटतो. ही कविता वाचल्यावर बा. सी. मर्ढेकर, आरती प्रभू, अरुण कोलटकर, दिलीप चित्रे यासारख्या स्वतंत्र अस्तित्त्व दर्शविणाऱ्या परंतु माणसाच्या अंतर्मनाचा तळ गाठणाऱ्या कवींच्या कवितांचे स्मरण होते. परंतु तरीही 'फुलाहून वेगळा फुलांचा वास-तसा



अनुक्रमणिका

तुझा स्वभाव' हे कवीने उद्‌गारलेले शब्द म्हणजे त्यांच्या कवितेचे परंपरेत राहूनही वेगळेपणाचे द्योतक आहेत. कवितेत निसर्गजंगल या आदिम प्रतिमेप्रमाणे जीवनातील सुखदुःखाचे प्रसंग, स्त्रीचे अस्तित्त्व यांनाही सहजपणे पण अर्थपूर्णपणे स्थान मिळाले आहे. किंबहुना 'मी जेव्हा दुःखी असते./मला तुझी आठवण येते' असे जणू कविताच कवीला बोलते करते. गरतीच्या शालीनतेप्रमाणे ही कविता कधी संयमाने तर कधी स्त्रीसुलभ औदार्याने सजग होते. त्यामुळेच हा कवी 'ओढीत दुःख फिरलो, भिजलो कधीही नाही' अशा शब्दात आपल्या सोशिक जीवनाला शब्दबद्ध करतो. कारण ही कविताच कधी कधी 'माझा विरह हाच तिच्या दुःखाचा आशय' होते. यातील स्त्री प्रतिमा आणि कविता वेगळ्या वाटत नाहीत, इतकी अंगभूत एकता येथे जाणवते.

'चिगूर' नंतरची ही कविता रंग, रूप, रस, स्पर्श, गंध यासारख्या प्रतिमातून प्रकटताना दिसते. किंबहुना शब्द हे साधन असले, तरी ही अर्थपूर्ण प्रतिमांची भाषा हीच या कवितेला अधिक भावते. उदा. 'शब्दांचे चूड' यातील दाहकता, 'अंधारकाजळची' खिन्नता, 'अंधाराच्या पखाली' यातील अर्थपूर्ण दृश्यात्मकता, 'रिता अंधार' मधील भयसूचकता आणि अनिश्चितता, 'अंधाराचं फूल', 'डोहामधलं भोळं पाणी', 'आभासाचे मृगजळ' मधील शून्यता, 'गुलाल उधळते उन्हाची कोवळीकता', 'दहिवरले ऊन्' मधील स्निग्धता, 'धुतले आकाश' मधील पारदर्शकता आणि निश्चितता, 'रेशमी उन्हा'तील प्रेमळ छटा, 'गंध फुवारे' मधील गंध आणि स्पर्श यांची प्रत्ययात्मकता, 'मुग्ध कळी'तील तारुण्यसुलभ प्रेमभावना, 'किर्र...र्र जंगलातील' भयसूचक वास्तवता, 'लुसलुसते उन्हा'तील प्रासादिकता अशा असंख्य प्रतिमासृष्टीने ही कविता समृद्ध झालेली आहे. 'हिमूर्जी', 'अब्द', 'विकेशा', 'अयाचित', 'अदमोर' यासारखे अनेक अनोखे शब्द येथे अर्थपूर्ण गूढता वाढवितात. ज्येष्ठाच्या ऐवजी 'जेठोडीचा पाणवारा' असे नामाचे वेगळे रूप, 'झिंझोडीत वारा' हे वाऱ्याचे श्रवणयुक्त रूप असे वेगळेपण अर्थाला अधिक गहिरेपणा देणारे शब्द कवितेचे रूप गूढतेने साकारतात. 'चैत', 'जेठ' यासारखे ग्रामीण शब्द आदिम संस्कृती साकारतात. कवीचे जंगलाशी आणि त्याच्या प्रतिमेशी रसरशीत नाते असल्याने निसर्गातील विविध रंगांची अनुभवाशी कधी मिसळण झालेली दिसते, तर कधी कधी उधळणही पहावयास मिळते. एकंदरीत आशय आणि अभिव्यक्तीचे एकरूप साकारण्यास कवीने सहजता साधली आहे. कवीच्या जीवनानुभवाचेच ते व्यामिश्र रूप आहे, असे वाटते.

कवी आपल्या अनुभव विश्वाशी एकरूप झाला आहे. तो आपल्याशीच सुखदुःखाचा संवाद करतो, स्वतःपासून फटकून वागतो आणि हा मानवी स्वभावच आहे. तरीही 'मावळतीचा घाट' या कवितेतील 'नभ वक्षांना/चुंबनास्तव/आकाशाचा ओठ झुके' या काव्यपंक्तीतील नभाच्या वक्षाला आकाशाचे ओठ कसे झुकतील ? माणूस स्वतःवर प्रेम करीत असला, तरी या ओळीतील भाव हा प्रणयाचा-शृंगाराचा आणि त्यातील स्पर्शाचा अर्थ सुचवितो. हा 'विसंगत' अलंकार तर नव्हे ? येथे चेतनागुणोक्ती अलंकाराचा वापर असला, तरी नभ आणि आकाश या एकाच रूपाच्या व्यापकतेची नावे आहेत. त्याच एकाच्या वक्षाचे आकर्षण हे येथे असंभव आहे. म्हणून हा चुंबनाचा प्रत्यय येथे निसर्गधर्माशी विसंगत वाटतो. स्वतःच स्वतःशी प्रेममय होण्याचा अनुभव कवीला सुचवावासा वाटतो की काय, न कळे ? तसेच मातृत्व आणि बाल्यसुलभ वात्सल्याचा अन्वय येथे लावला, तरी तो भावही त्या अर्थाने या रचनेत जाणवत नाही. तसेच 'स्थिरचित्र' (पृ. ७४) ही कविता 'रात्र' या नावाने पुन्हा (पृ. ७९) वेगळ्या नावाने का छापली ? कवितेचा आशय एकच आहे. मग शीर्षकाने कवितेचा अर्थ बदलतो का ? या बाबी खटकण्यासारख्या आहेत.

तरीही एक आशयसंपन्न अशी ही कविता 'नामगवळी' यांनी मराठी कवितेच्या प्रवाहात आणून सोडली. काही भावगीतात्मकता, मुक्तछंद, अभंगवाणी यांच्या स्वरूपाबरोबरच गझलेच्या रूपातही ही कविता अर्थपूर्णरित्या साकारली आहे. तिची रसिक, विचक्षण वाचक निश्चितपणे दखल घेतील, यात शंका वाटत नाही.

'चिगूर' नंतरची कविता : श्री शिवाजी नामगवळी,
चिगूर, प्रकाशन, मनमाड - २००७.

**प्राचार्य डॉ. पंडितराव पवार**
**नाशिक**

□

# भावपूर्ण खंडकाव्य 'सखी सावित्री'

□

डॉ. मंदा खांडगे



'सखी सावित्री' हे प्रा. मंदा कदम यांच्या लेखणीतून साकार झालेले सावित्रीबाई फुले यांचे पद्यमय भावगर्भ चरित्र. 'कातरवेळ', 'साजणवेळा', 'ऋतुनाद' असे कवितासंग्रह, प्रा. मंदा कदम यांच्या नावावर आहेत. मंदा कदम यांची स्वतःची अशी खास लेखनशैली आहे. 'गंधवीणा' या ललितलेखांचा संग्रह त्यांच्या आगळ्या वेळ्या सकस लेखणीतून साकारलेला आहे. 'सखी सावित्री' हे २६८ पानांचे सावित्रीबाई फुले यांचे काव्यकर्तृत्व सिद्ध करणारे आणि जोतिबा फुले आणि सावित्रीबाई या दांपत्याच्या भावजीवनाचा आलेख चितारणारे भावबद्ध असे खंडकाव्य आहे. अलीकडच्या काळात खंडकाव्य लेखन हा प्रकार जवळजवळ लुप्तच झाला आहे. या पार्श्वभूमीवर प्रा. मंदा कदम यांचे हे खंडकाव्य लक्षवेधी ठरते. ते स्वागतार्ह आहे. त्यातून जोतिबा फुले आणि सावित्रीबाई या दोघांमधील भावबंध, सामंजस्य, साहचर्य यांचे पदर अतिशय हळुवारपणे उलगडले आहेत. या दोघांच्या सामाजिक कार्याचा आढावा घेणारे अनेक ग्रंथ अभ्यासकांनी लिहिले आहेत; पण पद्यमय असे प्रथमच लिहिले गेले आहे. ह्या खंडकाव्याला दिलेले 'सखी सावित्री' हे नावही यथोचित आहे. पत्नीपेक्षाही दोघांमधला सख्यभाव, जोतिबांनी सावित्रीबाईंना त्या कालखंडात पत्नी या नात्याला दिलेला समानतेचा दर्जा, जोतिबांच्या स्वप्नांना साकार करताना त्यात सावित्रीबाईंचा असलेला सहभाग. या सर्वांचा विचार करताना या खंडकाव्याचे 'सखी सावित्री' हे नाव अतिशय समर्पक वाटते.

स्वतंत्र व्यक्तिमत्त्वाच्या सावित्रीबाई अन्यायाविरूद्ध ठाम भूमिका मांडणाऱ्या, निर्णयक्षम वृत्तीच्या, शिक्षणाचे महत्त्व जाणणाऱ्या, क्रांतदर्शी सावित्रीबाईंच्या भावजीवनाचे अनेक पैलू प्रा. मंदा कदम यांच्या सिद्धहस्त लेखणीतून शब्दबद्ध झाले आहेत.

आठवणी रूपाने 'संवाद साधत, काही प्रसंगांना उजाळा देत. काही प्रसंगी नाट्यात्मकतेने केलेल्या या लेखनातून एक मोठा कालपट आणि त्यात घडलेले अनेक प्रसंग चित्रित होतात. मात्र त्याला कालानुक्रम नाही. बालवयात लग्न होऊन फुल्यांच्या घरात प्रवेश केलेली सावित्री, जोतिबांनी तिला दिलेले शिक्षण, या शिक्षणामुळेच सावित्रीच्या व्यक्तिमत्त्वाची घडण झाली. जोतिबांच्या कृतीशील विचारांचा पगडा त्यांच्या मनावर उमटला. त्यामुळे गृहिणी ही भूमिका बजावतानाच सावित्रीबाई शिक्षणामुळे आलेल्या आत्मभानातून समाजाकडे डोळसपणे पाहताना दिसतात. या खंडकाव्याच्या सुरुवातीस २९ ऑगस्ट १८६८ सालचे सावित्रीबाईंना जोतिबांना लिहिलेले एक पत्र दिले आहे. त्यावरून त्यांच्या निर्णयक्षमतेचा प्रत्ययही येतो.

खंडकाव्याच्या सुरूवातीला जोतिबांच्या महायात्रेचे निरोपाचे क्षणचित्र मन हेलावणारे आहे. जोतिबांचा मृत्यू हा सावित्रीबाईंना एक जबरदस्त धक्का. पण त्यालाही त्यांनी अतिशय धीराने तोंड दिले. या आपद्प्रसंगी जातीबांधवांनी जोतिबांच्या दत्तकपुत्राला जातीवरून विरोध केला; तेव्हा 'टिटवे' स्वतः हाती धरून अतिशय धीरोदात्तपणे सावित्रीबाईंनी पतीचे क्रियाकर्म पार पाडले.

*'धन्य सावित्री ! जोतिबाची धुरा सांभाळणारी*
*आज प्रत्यक्ष जोतिबाच्या पुढेच*
*दोन पावले टिटवे हाती घेऊन*
*एक नवा इतिहास घडवून'*

अशा शब्दात सावित्रीबाईंना गौरविले आहे.

'सखी सावित्री' वाचताना जाणवते, ही सगळी स्मरणचित्रे आहेत. वर म्हटल्याप्रमाणे त्याला कालानुक्रम नाही. संज्ञाप्रवाही 'फ्लॅश बॅक' आहेत. निमित्ताने सावित्रीला काही आठवते; आणि संवादातून त्या प्रसंगाची लय साधली जाते. आयुष्यात घडलेले प्रसंग, आयुष्यात आलेल्या व्यक्ती, त्यांचे भावबंध, जोतिबा आणि त्यांच्या मित्रपरिवारातील भावबंध, त्याचा परिवार, जोतिबांची त्यांना मिळालेली साथ, काही प्रसंगांमधून जोतिबांचे उमललेले व्यक्तिमत्त्व याची गुंफण तर आहेच. पण प्रामुख्याने जोतिबा आणि सावित्रीबाई यांच्या दांपत्य जीवनाचा भावनापट उलगडण्याचा एक प्रयत्न आहे. परस्परांवर अतिशय निष्ठा, प्रेम असणारे हे दांपत्य. सावित्रीबाईंसारखी गुणी समंजस पत्नी, बुद्धी स्वतंत्र देणगी असलेली आणि एक द्रष्टा, क्रांतदर्शी, बंडखोर विचारसरणीचा नेता. आपल्या पतीचे विचार पारखून घेऊन त्याचे थोरपण जाणून त्याला सर्वार्थाने साथ देणारी त्याची सखी. यांच्यातील हळुवार भावनांचे चित्रण कवयित्रीने अतिशय सोप्या सहज शब्दात केले. आपल्या पतीच्या कार्याचे मोठेपण त्यांना उमगले होते. म्हणूनच त्या म्हणतात.

*पारदर्शी काच स्फटिक ते !*
*त्यांनी जे पेरिले माझ्या मनी आले*
*भरघोस पीक विचारांचे*
*कोण काय म्हणे कोण काय टोचे*
*नाही लक्ष दिले कदापिही.*
.......... ..........
*ऋषितुल्य मन चैतन्याचा झरा*
*नाही अहंभाव किंचितही*
*त्याच संस्कारात जडले घडले*
*हळूहळू झाले एकजीव'*

म्हणूनच जोतिबांच्या स्वप्नांच्या सावित्रीबाई भागीदार झाल्या. स्त्रीचे दुःख त्यांना उमगले.

*'किती शृंखला या नारीच्या भवती*
*तुटतील कधी भविष्यात*
*एकदाच येणे जगात जन्माला*
*श्वासही मोकळा घेऊ नये ?*

ही स्त्रियांची स्थिती होती; आणि स्त्रियांचे स्वातंत्र्य हे जोतिबांचे स्वप्न होते. म्हणून सावित्रीबाई म्हणतात.

*'स्त्रियांचे स्वातंत्र्य जोतिबांचे स्वप्न*
*त्याच्यासाठी वीट ठेवीन मी*
*शिक्षणाची शक्ती नारीला देईन*
*उद्याच्या जगात कल्पतरू'*

यावर जोतिबा म्हणतात,

*"वाहू या सावित्री आयुष्य आपुले*
*कितीतरी आहे काम पुढे"*

अशा संवादातून हे खंडकाव्य पुढे सरकत राहाते.

*"बीजे तरी पेरू उगवेल नक्की*
*उद्या आपोआप नवे पीक."*

असा आशावादही आहे. विचारप्रवणता आहे. म्हणूनच सावित्रीबाई एका प्रसंगी जोतिबांना विचारतात.

*एक विचारू का स्वामी खरे खरे सांगा बरे*
*सत्तावनच्या समराचे अपयश नाही सले ?*

इथे जोतिबांचे याविषयी विचार आणि स्वातंत्र्याबद्दल विचार व्यक्त होतात.

*इंग्रजांचे राज्य बरे ! तूर्त अशा संधीकाली*
*जर आली भटशाही तर पुन्हा बला मोठी*
*हवे स्वातंत्र्य हे खरे पण मन व्हावे जागे*
*शिक्षणाचे पीक येता मग स्वातंत्र्यही रूजे"*

जोतिबा हे काळाप्रमाणे समाजरचनेत बदल व्हावा, शिक्षण मिळावे, स्त्रियांनाही शिक्षण मिळावे, अशा विचारांचे होते. 'इंग्रजांचे राज्य' जोतिबांना हवे होते; पण त्याचे कारण काय होते ? त्याचे समर्थन करताना जोतिबा म्हणतात,

*"थोडे दिस इंग्रजांचे समदर्शी राज्य हवे*
*उजळून प्रकाशाने जाऊ देत सर्व घरे !*
*जेव्हा जाण येईल रे ज्ञानामुळे सर्वांनाच*
*निघोनिया जातीलच इंग्रज हो आपोआप"*
*'इंग्रजांना घालवावे असे वाटे स्वामींनाही."*

आपल्या पतीचे विचार आणि भूमिका सावित्रीबाई मांडतात.

इंग्रजांच्या राज्यात मिळणाऱ्या शिक्षणाने समाज परिवर्तन होईल ही ठाम आशा यातून चित्रित होते.

*अज्ञानात राहे देहाचा घटक*
*कसा होई मग देश मोठा*

यासाठी कृतीप्रवण व्हायला हवे हा सावित्रीबाईंचा

निर्धार होता.

ब्राह्मण मित्राच्या लग्न समारंभात एक शूद्र म्हणून जोतिबांचा, आपल्या पतीचा झालेला अपमान आणि त्यामुळे त्यांच्या मनाचा झालेला क्षोभ त्यावेळी सावित्रीबाई जे विचार बोलून दाखवतात तेव्हा त्यांच्या विचारांची झेप केवढी आहे हे लक्षात येते.

*'शिकलेले तुम्ही म्हणून कळला*
*मान अपमान । तुम्हालागी*
*नशीबात ज्यांच्या । सदा अपमान*
*नाही त्याची जाण । त्यांचे काय ?*

अशाप्रसंगी आपल्या पतीला शांत करताना त्या म्हणतात,

*'अज्ञानाची झोप । माझी मोडली ना*
*तशीच सर्वांची । मोडा स्वामी*
*जातीवंत माळी । फुलवा सुगंध*
*अडाण्यांच्या जगी । अक्षरांच्या'*

शिक्षण आणि जनजागरण ही प्रक्रिया आहे हे ओळखणारी सावित्री ही जोतिबांचे प्रेरणास्थान होती. केवळ पत्नी नाही तर सखी होती. प्रसंगी धीर देणारी, आश्वासक, त्यांच्या सुखदुःखात रमणारी. जोतिबांच्या झालेल्या चुका देखील सौम्यपणाने पण रोखठोकपणे सांगण्याचे धाडस असणारी, विचारांचे अधिष्ठान असणारी. भालेकर हे जोतिबांचे मित्र पण दीनबंधूमध्ये त्यांनी जोतिबांचा 'धर्मगुरू' असा उल्लेख केल्यावर ते दुखावले गेले. त्यावेळी त्यांची समजून काढताना त्या म्हणतात.

*'कधीच स्वतःचा नव्हता विचार*
*आणि आटापिटा गुरूत्वाचा*
*थोडे समजून घ्यायला हवे होते*
*आपलेच होते भालेकर*
*स्वामींनी तरीही नाही दोष दिला*
*मनातून परी खचले ते'*

सावित्रीबाईंचे मन ओळखून जोतिबा म्हणतात,

*'चुका दाखविल्या बरे झाले साऊ*
*पण काय करू तूच सांग*
*स्वामींचा कातर स्वर ऐकोनिया*
*फाटले आभाळ मनाचे ही...'*

सावित्रीबाईंना 'साऊ' संबोधताना दोघा पतीपत्नीमधील आत्यंतिक जिव्हाळा आणि दृढ नाते चित्रित होते आणि वरील ओळीतून दोघांतील सामंजस्यही दिसते.

जोतिबांची साऊ शिकली. शिक्षिका झाली. जोतिबांच्या शाळेत शिकवू लागली. सनातनी समाजाने सावित्रीबाईंना त्यासाठी छळले. गृहत्याग करावा लागला. तिचे सासरे अगतिक होते. पण आपल्या सासऱ्यांची असहायता तिला समजली आणि पतीच्या मनाची घालमेलही. त्यावर धीरोदात्तपणे त्या म्हणतात,

*'वनवास नाही । स्वामी ही कसोटी*
*खचून नाही हो । चालणार'*

असे कसोटीचे अनेक क्षण, त्यांच्या आयुष्यात आले पण त्यांनी ते लीलया पेलले.

समाजासाठी अहोरात्र झटणाऱ्या जोतिबांच्या साऱ्या आयुष्याच्या साक्षीदार सावित्रीबाई होत्या. फुल्यांचे कर्तृत्व पाहून इंग्रज सरकारने त्यांना नगरपालिकेवर नियुक्त केले होते. समाजोपयोगी त्यांचे कार्य सरकारने जाणले होते. मतदानाने निवडणूक झाली; तेव्हा जोतिबा पराभूत झाले. फुले या घटनेने हतबल झाले. त्यावेळी सावित्रीबाईंनी त्यांना सावरले. एका हळुवार नात्याने समाजाची मानसिकता समजावून घेऊन, त्यांनी आपले विचार व्यक्त केले. सावित्रीबाई आणि जोतिबा काळाच्या कितीतरी पुढे होते. पण ते समाजाने त्यावेळी ओळखले नव्हते सावित्रीबाई म्हणतात,

*"झापडे लावून जगतो समाज*
*लगेचच नवे मानवे का*
*गुलामगिरी ही हीच मानसिकता*
*हाडीमासी जणू भिनलेली*
*वेड्यांच्या जगात शहाणाच वेडा*
*सत्य परी दुजे वेगळेच*
*सत्यासाठी झुंज ज्यांनी ज्यांनी दिली*
*साऱ्यांच्याच पुढे हाच वाटा"*

आपल्या पतीला समजवणारी खरी कर्तव्यदक्ष पत्नी दुहेरी भूमिका उत्तमपणे पार पाडताना दिसतात.

भ्रूणहत्या, केशवपन, याच्या विरोधात फुले पतीपत्नींनी आघाडी उघडली; पण कर्मठ समाजाला ते पचत नव्हते. त्यावेळी त्यांना वाटते,

*'कधी कधी वाटते हो फुले पचलेच नाही*
*विश्व किती मोठे बाई डोळा मावलेच नाही.'*

सावित्रीबाईंच्या मनाचा तळ शोधणारे अनेक प्रसंग



अनुक्रमणिका

कवयित्रीने चित्रित केले आहेत. परित्यक्तांचे दुःख, विधवांचे दुःख, फसलेल्या स्त्रियांचे दुःख, पाण्याविना तडफडणाऱ्या शूद्रांचे दुःख, युगानुयुगे गुलामगिरीत जखडलेले अशांविषयी त्यांना वाटणारी करुणा. सावित्रीबाई म्हणतात,

*भूतदया शब्दानेच माणसाची कीव येते*
*दीनवाणे होऊनीया मनुष्यत्व हीन होते'*

समाजजीवनाकडे पाहणारी सावित्रीबाईंची दृष्टी यातून व्यक्त होते.

कर्मकांडाला हाणून पाडायचे तर प्रवाहाविरूद्ध पोहावेच लागते. स्त्री जातीचे दुःख जिला उमगले त्या सावित्रीने केशवपनाविरूद्ध बंड पुकारताना पतीला साथ दिली.

*'नाभिकांच्या सभेमध्ये सावित्रीचा पुढाकार*
*माझ्या लाडक्या बंधूंनो जरा करा रे विचार*
*नका करू पैक्यासाठी भगिनींचा अनादर'*

असे कळकळीने आवाहन केले.

बुलढाण्याच्या ताराबाई शिंदे यांनी पुरुषांच्या जुलुमाविरुद्ध झोड उठवली. फुले पती-पत्नीला त्यांची न्याय्यबाजू, त्यांचा त्वेष, त्यांचा रोखठोकपणा सारे भावले. ते योग्य 'शब्दात वर्णिले आहे ताराबाईंच्या भूमिकेविषयी त्या म्हणतात,

*'स्वामी फार आनंदले भविष्याची नांदी इथे*
*मला दिसे बरे आता कौतुकाने शाबासिले.'*

दत्तकपुत्र यशवंत त्याच्या बालभावना, आई म्हणून कर्तव्य, पती समाजकार्यात गुंतलेले ! अशावेळी त्यांनी कर्तव्यदक्ष आई म्हणून निभावलेली भूमिका, आपल्या जन्माविषयी यशवंताला समजल्यावर त्याच्या मनाची झालेली उलघाल आणि त्याची समजून घालताना सावित्रीबाईंनी दिलेली उदाहरणे, त्याच्या मनातला सल काढून टाकताना सावित्रीबाईंनी त्याला विश्वासात घेऊन समजावणे, एका मातेचे अंतर्मन त्यातून उलगडते. संवेदनशील स्त्रीची मनोभूमिका त्यातून दृग्गोचर होते.

निराधार स्त्रियांच्या मुलांसाठी त्यांनी बालकाश्रम काढला. आईच्या मायेने त्या मुलांचे संगोपन फुले दांपत्य करीत असे. तापसरीत बाळं बळी पडली तेव्हा त्यांच्या मनाचा कल्लोळही काव्यरुपात चितारला आहे. पोटी संतान नव्हते तरी हे दांपत्य कधी उदास झाले नाही.

आठवणींच्या हिंदोळ्यावर झुलताना त्यांना ऐकू येते–

*'साऊ तू आणि मी वेगळे का आहोत ?*
*किती विचार करशील ?*
*मी आहेच तुझ्यात सामावलेला.*
*माझ्या चिरविश्रांतीनंतर*
*माझं स्वप्न किती तोलून धरलंस तू.'*

अशी भावना आपल्या पतीच्या मनात होती म्हणूनच सावित्रीबाईंनी

*''आयुष्यभराचं असिधाराव्रत*
*अखंड तेवले रात्रंदिन*
*तयांच्या माघारी चालविले व्रत''*

अखेरपर्यंत सावित्रीबाईंनी आपला शब्द पाळला. प्लेगच्या साथीत अंगी ज्वर असूनही आपलं कर्तव्य

## देणगीदार – १ जून ते ३१ ऑगस्ट २००८

| क्र. | दिनांक | नाव | रक्कम | |
|---|---|---|---|---|
| १) | १२-६-२००८ | डॉ. सु. प्र. कुलकर्णी | ३८८/- | योगक्षेमार्थ देणगी |
| २) | १२-६-२००८ | दि महाराष्ट्र एक्झीक्युटिव्ह अँड ट्रस्टीज कं. प्रा. लि. | ५,०००/- | का. र. मित्र व्याख्यान-मालेसाठी देणगी |
| ३) | १७-६-२००८ | पराग जोगळेकर | १,५०,०००/- | डॉ. गं. ना. जोगळेकर स्मृतिदिनासाठी देणगी |
| ४) | २६-६-२००८ | केशव गणेश जोशी | २५,०००/- | योगक्षेमार्थ देणगी |
| ५) | ३-७-२००८ | सरिता वाकलकर | ५,०००/- | बालविभागासाठी देणगी |
| ५) | ५-७-२००८ | पराग जोगळेकर | ५०,०००/- | ग्रंथालयासाठी देणगी |
| ७) | १८-७-२००८ | फादर फ्रान्सिस दिब्रिटो | २,०००/- | योगक्षेमार्थ देणगी |
| ८) | १-८-२००८ | पराग जोगळेकर | ३०,०००/- | स्मृतिदिनासाठी देणगी |
| ९) | १२८-२००८ | पराग जोगळेकर | १४,०००/- | स्मृतिदिनासाठी देणगी |



अनुक्रमणिका

बजावलं. मृत्यूचं भय त्यांना वाटलं नाही. 'स्वामीं'ना दिलेला शब्द अखेरपर्यंत पाळला.

दत्तकपुत्र यशवंत त्याची पत्नी लक्ष्मी यांचा संसार त्यांनी पाहिला. सुनेला शिकायला प्रवृत्त केलं. कर्तृत्ववान पतीच्या निधनानंतर भावनांचा कल्लोळ आवरत त्या म्हणतात,

*''करुणा सागर स्वामी माझा !*
*पौर्णिमेचा जन्म पौर्णिमेचा मृत्यू*
*एक पूर्ण चंद्र डागाविना.''*

एका ओळीत आपल्या पतीचे जीवनाचे सार सावित्रीबाईंनी वर्णिले आहे.

आपले पती जसे समाधानी वृत्तीने गेले तसेच आपण जावे असे त्यांना वाटते. मुलांचे समाजकार्य पाहून त्या तृप्त होतात. वडिलांचे व्रत चालविण्याचे समाधान त्यांना आहे. शेवटपर्यंत कार्यरत असलेल्या सावित्रीबाईंची, जोतिबांच्या सखीची, समाजपरिवर्तनाचा ध्यास घेतलेल्या दांपत्यांची ही जीवनकहाणी. तटस्थपणे केलेले हे चित्रण आपल्याला भावते. स्वतंत्र विचारांच्या सावित्रीबाईंच्या कार्यकर्तृत्वाची झेप, त्यांनी पती माघारी पेललेली त्यांच्या कार्याची धुरा, त्यांचे कवित्व गुण, त्यांची समाजाविषयी असलेली कर्तव्यनिष्ठा सारेच प्रा. मंदा कदम यांनी यथायोग्य चित्रित केले आहे.

अत्यंत नेटकेपणाने, तरलतेने हे काव्य सिद्ध झाले आहे. अभंग वृत्तांत, मांडणी आहे. अष्टाक्षरी, षडाक्षरी, काही वेळेला 'साकी'वृत्त वापरून मुक्तछंदाच्या अंगाने या खंडकाव्याची बांधणी केली आहे. साधेपणाने केलेली मांडणी, शब्दप्रवाह, कुठेही न थांबता अखंडपणे वाचावे अशी ओढ वाटावी अशी शब्दांची लय हे काव्याचे वैशिष्ट्य. एक चांगले काव्य वाचल्याचा निर्भेळ आनंद हे खंडकाव्य वाचल्यावर मिळतो.

सखी सावित्री, प्रा. मंदा कदम, हिरण्यकेशी प्रकाशन, कोल्हापूर. २००७, पृष्ठे २६८, मूल्य. २२५ रु.

**मंदा खांडगे**
२४, ऋणानुबंध, 'अमलताश' डीपी रोड औंध, पुणे ४११००७.





अनुक्रमणिका

□

# तंत–कवी – एक सिंहावलोकन

□

डॉ. मार्तंड दि. कुलकर्णी



"डफावर" थाप मारून समाजाला जागवणारा असा तो शाहीर. मराठी साहित्य क्षेत्रात - शाहिरी वाङ्मयाला एक महत्त्वाचे स्थान. प्राचीन मध्ययुगीन काव्य धारेत संत-पंत व तंत असे कवितेचे तीन प्रकार मानले जातात. त्यातील "तंत" काव्य म्हणून ओळखले जाणारे काव्य म्हणजे शाहिरी काव्य होय. शाहिरी कवितेने वाङ्मयात अढळ स्थान निर्माण केले आहे. या काव्याला मराठी कवितेचा "उषःकाल" म्हणून ओळखले जाते.

पोवाड्यात मराठ्यांच्या इतिहासाची अमूल्य बीजे दडलेली आहेत. लोकरंजनातून समाज प्रबोधन करणारा शाहीर "देशभक्त" म्हणून गणला गेला. गौरविला गेला. एकंदरीत शाहिरी काव्याला एक महान अशी परंपरा लाभली आहे. मराठी शाहिरीची सुरुवात तशी शिवशाही पासून झाली; आणि पेशवाईत त्याचा विकास झालेला दिसून येतो. पेशवाईच्या अस्तानंतर काही काळ शाहिरी कलेला उतरती कळा लाभल्याचे दिसून येते. शाहीर अगीनदासाने रचलेल्या 'अफझलखान वधाचा पोवाडा' वाङ्मयात पहिला व प्राचीन पोवाडा म्हणून समजला जातो. पोवाडे हा जसा शाहिरी वाङ्मयाचा एक महत्त्वाचा भाग तद्वत लावणी-कटाव-फटके हा देखील तेवढाच महत्त्वाचा काव्य प्रकार. पोवाडे गाण्याला स्फुरण देण्यासारखे विषय शाहिरी काव्याला शिवछत्रपतींच्या पराक्रमानेच पहिल्यांदा प्राप्त झाले. मराठी राज्याचे वैभव जसजसे वाढत गेले तशी पोवाड्याची साधी व गद्यसदृश्य रचना अपुरी पडू लागली. वैभवा बरोबर विलासीपणा वाढत गेला.

वीररसाला दिवसेंदिवस शृंगाराची जोड प्राप्त होत गेली. साधा-सरळ परंतु जोरदार पोवाडा असतानाही लावणीतील रंगेल मुरकेबाज ताना मान्यता पावू लागल्या. तेराव्या शतकाच्या अखेरीपासून अठराव्या शतकाच्या शेवटपर्यंत हा जो मराठी वाङ्मयाचा इतिहास आहे, त्यात शाहिरी वाङ्मय हे पराक्रमगाथेशी एकजीव झालेले दिसते.

महाराष्ट्राच्या आत्म्याशी शाहिरी काव्य तादात्म्य पावलेले आहे. आज जे काही शाहिरी काव्य उपलब्ध आहे ते महाराष्ट्राच्या इतिहासाशी संलग्न आहे. दिल्लीच्या तख्तापर्यंत ज्यांनी मजल मारली, त्या मराठ्यांच्या चालीरीती, मराठ्यांचे विचार, मराठ्यांचा इतिहास यांच्याशी शाहिरी काव्याचे तादात्म्य झालेले दिसून येते. शाहिरी काव्यात मराठी राज्याची तसेच त्यांच्या साम्राज्याची चढती-उतरती कळा प्रतिबिंबित झालेली आहे. शाहिरी काव्य प्रवृत्तीपर असे काव्य आहे. या काव्यात महाराष्ट्राचा स्वभाव प्रतिबिंबित झालेला आहे. हे काव्य मराठ्यांच्या मनोवृत्तींचे श्राव्यरूपच होय. हे काव्य मराठ्यांच्या अंतःकरणाचा एक सहजोद्गार होय.

आजपर्यंत अनेक जाणकारांनी शाहिरी काव्याचा वाङ्मयीन अभ्यास केला आहे. कै. अ. ब. कोल्हटकरांना हे काव्य म्हणजे मराठी काव्याची प्रभात वाटते. डॉ. गंगाधर मोरजे यांनी मराठी लावणीचा स्वतंत्र असा अभ्यास केला आहे. म. वा. धोंड यांच्यासारख्या समीक्षकांनी "मऱ्हाटी लावणी" व "ओवी ते लावणी" या ग्रंथातून शास्त्रशुद्ध मांडणी करून लावणीचे प्राचीनत्व सिद्ध केले आहे.

समाजप्रबोधन व लोकरंजन करून लोककला जिवंत ठेवण्याचे फार मोठे कार्य शाहिरांनी केल्याचे दिसते. या लोककलेने खेड्या-पाड्यांतील वर्षभराच्या

अनुक्रमणिका

शिणलेल्या-मरगळलेल्या लोकजीवनाला एक नवे चैतन्य दिले. लोक कलावंतांनी-लोकशाहिरांनी-सामाजिक स्तरावर सांस्कृतिक जडण-घडण केली. पेशवेकालीन शाहिरांच्या नंतर काही काळ तमाशा-कला मंदावली. परंतु शाहीर पठ्ठे बापूरावांसारख्या शीघ्रकवी-तल्लख प्रतिभावंताने तमाशाला जिवंतपणा आणून दिला. तमाशाला पुन्हा एकदा बहर आणला. लोकरंजनांबरोबर लोक प्रबोधनाचे महत्त्वपूर्ण कार्य शाहिरांनी केले हे त्यांचे फार मोठे योगदान म्हटले पाहिजे. जनतेच्या कानावर देशभक्तीबरोबर मनशुद्धीचा सोपा मंत्र देण्याचे कार्य शाहिरी मंडळी करताना दिसतात. शाहिरांनी आपल्या काव्यात जे विषय निवडले ते बहुजन समाजाला आवडतील असेच होते. शाहिरांनी आपल्या काव्यातून लोकांच्या त्या-त्या वेळच्या भावनांची प्रतिक्रिया कवनातून व्यक्तविण्याचे कार्य केले आहे. शाहिरांनी विशेषतः लौकिक विषयावर कवनांची रचना केली. सामान्यांच्या संसारी जीवनातील हर्षामर्षाच्या प्रसंगांना काव्यविषय करण्याच्या बाबतीत शाहिरांनी बराच धीटपणा दाखविला आहे. वैयक्तिक-सामुदायिक जीवनातील आनंदाचा पुनःप्रत्यय घेण्या-देण्यासाठीच शाहिरांनी लावण्या-पोवाडे रचले हे विशेष होय. ह्या त्यांच्या महत्त्वपूर्ण योगदानावरून

---

## नवे आजीव सभासद

१) पाटील वळसंगकर स्मिता, पुणे
२) जाधव सुवर्णा अशोक, मुंबई
३) पाटील विष्णू विठ्ठल, उल्हासनगर
४) साळुंके दीपक भानुदास, उल्हासनगर
५) कोळी रवींद्र मोहन, उल्हासनगर
६) कोलते प्रल्हाद रावजी, उल्हासनगर
७) देशमुख रसिका विठ्ठल, औरंगाबाद
८) कुंटे चैतन्य ज., पुणे
९) शेलार मोहन किसन, देलवडी
१०) गांगुर्डे आनंदा नामदेव, बारामती
११) जाधव मोहन हिंदूराव, कौलगे
१२) पडवळ प्रमोद भगवान, वाराणसी
१३) तापीकर मधुकर नारायण, पुणे
१४) तापीकर कल्पना मधुकर, पुणे
१५) भंडारे वसुधा रवींद्र, पुणे
१६) तळेकर अशोक शिवाजी, टाकळी (अ.नगर)
१७) पुराणिक मोहन रघुनाथ, पुणे
१८) गोफणे लक्ष्मण शंकर, सोलापूर
१९) शिरसाटे राजीव चिंतामणी, जळगाव
२०) साळगावकर राजलक्ष्मी जयराम, मुंबई
२१) साळगावकर जयराज जयंत, मुंबई
२२) पाध्ये विजय बाळकृष्ण, मुंबई
२३) जोगळेकर उज्ज्वला, पुणे
२४) जाधव रामचंद्र जगन्नाथ, चिंचवड
२५) बनकर दशरथ रघुनाथ, चिखली
२६) महाजन रमेश भगवान, आकुर्डी
२७) वाव्हळ बाळासाहेब दत्तात्रय, थेरगाव
२८) देवधर वैभव, पिंपरी
२९) पंडित विजय, पुणे
३०) जाधव मधुकर रामचंद्र, चिंचवड
३१) घोडे शिवाजी भिकाजी, चिंचवड
३२) मानकर सुनील, अक्कलकोट
३३) दुउडे संघप्रकाश मारुती, सोलापूर
३४) पाटील शिवराज विश्वनाथ, सोलापूर
३५) धोकटे मंगलमूर्ती शशिकांतराव, सोलापूर
३६) कोनापुरे देविदास दत्तात्रय, सोलापूर
३७) बोबडे कल्याण दशरथ, भोसरी
३८) माने बाबासाहेब कोंडिबा, भोसरी
३९) खानोलकर संजय गजानन, चिंचवड
४०) लेले विवेक, पिंपरी
४१) खानोलकर विनायक, पुणे
४२) दीक्षित मनोहर सदाशिव, चिंचवड
४३) आपटे विश्वनाथ, चिंचवड
४४) पाटील विलास दयाराम, सांगवी
४५) वाढवणे सीतारामभाऊ, चिंचवड
४६) बगाडे विठ्ठल हरिचंद्र, चिंचवड
४७) पवार जयवंत बळवंत, चिंचवड
४८) चव्हाण अमोल मारुती, चिंचवड
४९) काळे चंद्रशेखर भारत, पुणे
५०) दीक्षित अनंत भगवान, पुणे
५१) अनगळ मुकुंद, पुणे
५२) तांबरे सतीश उमेश्वर, पुनावळे
५३) थोरात अशोक विष्णुपंत, अमरावती
५४) पाटील नथुराम धोंडिबा, पुणे
५५) बोर्डे अलका सॅमी, पुणे
५६) मोडक अरुण विजय, पुणे
५७) देशपांडे अर्चना आनंद, मुलुंड
५८) देशपांडे आनंद पांडुरंग, मुलुंड
५९) आडकर शरद रामचंद्र, पुणे
६०) कोकरे श्रीकांत राजाराम, जत
६१) देशपांडे नितीन शंकर, पुणे
६२) देशपांडे स्वाती नितीन, पुणे
६३) अनवलीकर लता सुधाकर, पुणे
६४) खिरे मोहिनी मोहन, मिरज



अनुक्रमणिका

त्यांना खऱ्या अर्थाने ''लोककवी'' समजले जाते. शाहिरांच्या आणखी एका महत्त्वपूर्ण योगदानासंदर्भात असे म्हटले जाते की, शाहिरांनी ऐहिकाकडे कविता आणली. मग ते ऐहिक ऐतिहासिक असो की समकालीन असो हे त्यांचे महत्त्वाचे कार्य समजले पाहिजे. वैराग्यपर लावण्यात वैयक्तिक सुखाबद्दलची जुगुप्सा संताइतक्याच हिरीरीने शाहिरांनी प्रकट केली आहे. लावण्यांतील शृंगार भावनेइतकीच त्यांची पारमार्थिक शिकवण परिणामकारक उतरली आहे.

*'सुंदर मूर्ती मदनाची, अमृतवदनाची,*
*मदनकदनाची, विखारी धार ।'*

या स्त्रीवर्णनाइतकीच

*'हटातटाने पटा रंगवुनि जटा धारिशि तू शिरी ।*
*मठाची उठाठेव का करी ।'*

ही दांभिकतेचा निषेध करणारी रामजोशींची प्रभावी वाणीही दिसून येते. खर्ड्याची लढाई, यशवंतराव होळकर, दुसरे बाजीराव यांच्यावर शाहीर अनंतकवीने रचना केली. पोवाडे उत्कृष्ट असले तरी 'स्नेहासाठी पदरमोड कर, परंतु जामिन कुणा राहू नको'' अशा व्यावहारिक उपदेश करणाऱ्या फटक्यांनीच अनंत फंदी अधिक प्रसिद्ध आहेत. शाहीर परशुराम या शाहिराने तर पौराणिक व तात्त्विक स्वरुपाच्या लावण्या लिहिल्या आहेत. त्यात रुपकांच्या द्वारा वेदांताचा सूर स्पष्टपणे ऐकू येतो. सगनभाऊ हा शाहीर जातीने मुसलमान धंद्याने शिकलगार शाहीर असूनही हिंदुंच्या देवदेवतांवर-रामायण-महाभारतातील कथांवर लावण्या लिहिताना दिसतो. शाहीर प्रभाकर यांनेही लावण्या पोवाडे रचून स्वतःचे विशेष योगदान सिद्ध केले आहे. नावे घेण्यासारखे अद्वितीय कार्य करणारे शाहीर प्रभाकर दातार, होनाजी बाळा यांचे कार्य महत्त्वपूर्ण ठरले.

*'नर जन्माअधि नरा करूनि घे नर नारायण घडी ।*
*तरिच हे सार्थक मानव कुडी ।'*

या बोधप्रद लावण्या लिहून राम जोशींनी 'कवीश्वर' ही उपाधी प्राप्त केली.

आजचे हे एकविसावं शतक-विज्ञान युग, पाश्चात्य संस्कृतीच्या अधिक जवळ जात असलेला आपला समाज अशाही काळात आपल्या कलेतून शाहिरीतून समाजप्रबोधन करीत आहे. महाराष्ट्रात शाहीर अण्णाभाऊ साठे- शाहीर अमर शेख-शाहीर गवाणकर यांनी जलशांद्वारे समाज जागृतीचे कार्य केले. त्यामुळे ही शाहिरी परंपरा नष्ट झाली असे म्हणता येणार नाही.

ज्यांनी ऐन तारुण्यात या कलेला आपले जीवन समर्पित केले व कला जिवंत ठेवली अशा लोक कलावंताची परिस्थिती विचार करायला लावणारी आहे. कित्येक कलावंत आर्थिक समस्येत पार बुडालेले आहेत. ज्या शाहिरीने सन्मानाचे दिवस पाहिले तीच शाहिरी आज एक चिंतेचा विषय ठरलेली आहे. याकडे सर्वांनी लक्ष देणे गरजेचे आहे असे वाटते.

---

**संदर्भ ग्रंथ :**

१) महाराष्ट्र सारस्वत - वि. ल. भावे
२) मराठी शाहीर - श्री. म. वर्दे
३) मराठी लावणी - म. वा. धोंड
४) ओवी ते लावणी - म. वा. धोंड
५) मराठी लावणी वाङ्मय - डॅा. गंगाधर मोरजे
६) प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास - ल. रा. नसिराबादकर
७) महाराष्ट्राचे शिल्पकार पठ्ठे बापूराव - प्रा. चंद्रकुमार नलगे.

**डॉ. मार्तंड दि. कुलकर्णी**
मराठी विभाग, सरस्वती महाविद्यालय,
किनवट, जि. नांदेड.
भ्रमणध्वनी : ०२४६९-२२२३८५, ९४२१७५८०३२





अनुक्रमणिका

निवडक नवे...

प्रा. मिलिंद जोशी

नव्याची दखल घेणाऱ्या ह्या सदरात निवडक कवितासंग्रहांचा परिचय दिला आहे. बाह्यरूप व अंतरंग यांचे हे विहंगमावलोकन आहे.

- संपादक

**बकुळगंध, सडा प्राजक्ताचा आणि अक्षरपान**



तीन तपाहून अधिक काळ जगदीश खेबुडकरांची कविता आणि गीते मराठी मनावर अधिराज्य करीत आहेत. गीतकार म्हणून अवघ्या महाराष्ट्राला ज्ञात असलेल्या खेबुडकरांची चिंतनशील कविताही तितकीच महत्त्वाची आहे. 'बकुळगंध', 'सडा प्राजक्ताचा' आणि 'अक्षरपान' या तीन कवितासंग्रहांच्या माध्यमातून भेटणाऱ्या खेबुडकरांच्या कवितेत खोलवर संस्कार करणारा प्राजक्त भेटतो, मंद मंद झुळुकेसरशी बेभानपणे लहरत जाणारा नित्यनूतन बकुळगंध भेटतो; आणि त्यांच्या विलक्षण प्रतिभेची साक्ष देणारी अनेक अक्षरपानं भेटतात. 'अक्षरपान' या त्यांच्या कवितासंग्रहाला 'मृत्युंजय' कार शिवाजी सावंत यांची प्रस्तावना लाभलेली आहे. वि. वि. शिरवाडकरांनी त्यांच्या कवितेविषयी काढलेले गौरवोद्गारही खेबुडकरांच्या कवितेचा अनेक कंगोऱ्यातून परिचय करून देतात. या तीन कवितासंग्रहाच्या माध्यमातून खेबुडकरांच्या अलौकिक काव्यसृष्टीचे अप्रतिम दर्शन रसिकांना घडते. संतकाव्यातली सात्त्विकता, पंतकाव्यातली भावुकता आणि तंतकाव्यातली उत्कटता यांचा अनोखा संगम खेबुडकरांच्या कवितेत आहे. अभिजात कवितांचा आस्वाद घेण्यासाठी हे संग्रह वाचायलाच हवेत.

(अक्षरपान, सडा प्राजक्ताचा आणि बकुळगंध - जगदीश खेबुडकर, सपना प्रकाशन, पुणे.)

**छावणीच्या कविता**



पत्रकार आणि कवी अशा दुहेरी भूमिकेतून ज्ञानेश्वर कोळी परिचित आहे. कष्टकऱ्यांची वेदना मांडणारी कविता त्यांनी 'जगणे माझे', 'आयुष्याच्या वाटेवर', 'आकाश पेलताना', 'घन दाटलेले' या कवितासंग्रहातून मांडली आहे. 'छावणीच्या कविता' हा वाचकांना अस्वस्थ आणि अंतर्मुख करणारा कविता संग्रह आहे. दुष्काळग्रस्तांची अंतःकरणं पिळवटून टाकणारी संघर्ष कथा या कविता संग्रहात आहे. छावणीत दाखल झालेली जनावरे, हतबल बायकामाणसे, स्वार्थी आणि कुचकामी शासन व्यवस्था, श्रेय घेण्यासाठी टपलेले पुढारी आणि सत्त्वपरीक्षा पाहणारा निसर्ग हे कोळींच्या कवितेचे विषय आहेत. या कविता संग्रहाला 'उपरा'कार लक्ष्मण माने यांची प्रस्तावना लाभली आहे. 'ज्ञानेश्वर कोळींची कविता तलवारीचे रूप घेते आणि सामाजिकतेचे गाणे गाण्यासाठी उभी राहते' अशा शब्दात लक्ष्मण मानेंनी या कवितेची प्रशंसा केली आहे.

(छावणीची कविता- ज्ञानेश्वर कोळी, सुयश प्रकाशन, पुणे, पृष्ठे ३२, किंमत ६० रु.)

### सृजनसंकेत



चपराक प्रकाशने प्रकाशित केलेल्या सृजनसंकेताच्या प्रातिनिधिक कवितासंग्रहाचे संपादन कवी महादेव केरे यांनी केले आहे. कोनाकोपऱ्यातील पस्तीस कवींच्या कविता समाविष्ट आहेत. बदलते सामाजिक संदर्भ आणि मूल्यव्यवस्था या कवितेतून प्राधान्याने दिसते. ग्रामीण जीवनातली व्यथावेदना आणि शहरी जीवनातला उद्ध्वस्तपणा नव्या दमाच्या कवींनी समर्थपणे कवितेत मांडला आहे. राजेंद्र पोतदार, महादेव कोरे, संदीप सामाले, मन्मथ बेलूरे, विमल खाचे, धनंजय सोलंकर, ऋचा घाणेकर, अंजली गोसावी यांच्या कविता विशेष उल्लेखनीय आहेत. घनश्याम पाटील या नव्या दमाच्या प्रकाशनाने अभिनव प्रयोग करून हा कवितासंग्रह प्रकाशित केला आहे. नव्या पिढीचे कवी आणि त्यांच्या विचारांची दिशा समजून घेण्यासाठी रसिक निश्चितच या काव्यसंग्रहाचे स्वागत करतील.

(सृजनसंकेत, संपादन महादेव कोर, चपराक प्रकाशन, पृष्ठे ४७, किंमत ५० रु.)

### प्राजक्तवेणा



नव्या कवींच्या प्रतिभेला व्यासपीठ मिळवून देण्याचे महत्त्वे काम डॉ. शंतनू चिंधडे आणि त्यांचे शब्दवैभव साहित्यप्रेमी मंडळ अनेक वर्षांपासून करीत आहे. 'प्राजक्तवेणा' हा त्यांचा चौदावा प्रातिनिधिक कवितासंग्रह चंद्रकला प्रकाशनाने प्रकाशित केला आहे. या कवितासंग्रहात विजया वाडेकर, जयश्री घुले, श्याम दशरथ, चंचल काळे, अंजली पेंडसे, अरुण देशपांडे, प्रसाद अत्रे, भूषण कटककर, सुधीर दाते या कवींच्या कविता समाविष्ट आहेत. या प्रातिनिधिक कवितासंग्रहाचे संपादन डॉ. शंतनू चिंधडे यांनी केले आहे. या सर्व कवितांमध्ये जीवनाचे सखोल चिंतन आहे. नवतेचे स्वागत आहे; तसा परंपरेचा अभिमान आहे. इथे चांगले उगवू शकते असा आशावादही आहे. या संग्रहातल्या अनेक कविता छंदो बहर आहेत. कवितांच्या उद्यानातली सफर रसिकांना निश्चितच समाधान देणारी आहे.

(प्राजक्तवेणा, संपादक - डॉ. शंतनु चिंधडे, चंद्रकला प्रकाशन, पृष्ठे ७२, किंमत ८५ रु.)

### तुकाराम पाटील यांच्या निवडक मराठी गझला



कथा, एकांकिका, नाटक, कादंबरी, ललितगद्य असे वाङ्मय प्रकार हाताळणारे तुकाराम पाटील हे उत्तम गझलकार म्हणून सर्वांना परिचयाचे आहेत. 'निर्मोही' आणि हे 'गोफ रेशमांचे' असे त्यांचे दोन गझल संग्रह प्रकाशित आहेत. त्याच्या निवडक पन्नास गझलांचे संपादन 'निवडक मराठी गझला' हे पुस्तक सिद्ध केले आहे. निर्मोही प्रकाशनाने ते प्रकाशित केले आहे. तुकाराम पाटील यांना गझलसम्राट सुरेश भट यांचे मार्गदर्शन लाभले. स्वतःचा वेगळा ठसा असणारी गझल तुकाराम पाटलांनी लिहिली याचा प्रत्यय हा गझलसंग्रह वाचताना येतो. डॉ. अविनाश सांगोलेकर यांचे अभ्यासपूर्ण प्रास्ताविक गझलेच्या उगमापासून ते आजच्या प्रवासापर्यंत मार्मिक भाष्य करणारे आहे. काव्य आणि गझलप्रेमी या आगळ्यावेगळ्या पुस्तकाचे निश्चितच स्वागत करतील.

(तुकाराम पाटील यांच्या निवडक मराठी गझला, डॉ. अविनाश सांगोलेकर, निर्मोही प्रकाशन, पृष्ठे ७८, किंमत ७५)



अनुक्रमणिका

(एका शहराच्या खुंटीवर, चंद्रशेखर सानेकर, ग्रंथाली प्रकाशन, पुष्ठे ७२, किंमत ७५ रु.)

**शीर्षकाच्या शोधात**

डॉ. कृष्णा मस्तुद हे ख्यातनाम मानसरोगतज्ज्ञ आहेत. त्यांच्या 'शीर्षकाच्या शोधात' या कवितासंग्रहात त्यांनी मनोरूग्णांच्या व्यथा कवितेच्या माध्यमातून मांडल्या आहेत. वाचकांना अंतर्बाह्य हलवून टाकणाऱ्या या कविता आहेत. सभोवती माणसांची गर्दी असणे आणि यातला कुणीच आपल्या जीवाभावाचा नाही, उपयोगाचा नाही मी भावनाच भयावह आहे. मनोविकारांनी ग्रासलेले रुगंवर उपचार करताना त्यांच्या भावना संवेदनशील कवी असणाऱ्या या डॉक्टराने आपल्या कवितेत मांडल्या आहेत. अस्वस्थ झालेला हा कवी शीर्षकाच्या शोधात आहे. स्वतःच्या कोशात जगणाऱ्या समाजाने या कवितांना शीर्षके द्यावीत अशी कवीची अपेक्षा आहे. साठोत्तरी मराठी कवितेने कात टाकलेली आहे. नव्या जाणीवा, नव्या भावना या कवितेने व्यक्त केलेल्या आहेत. मनोरुग्णांची व्यथा डॉक्टरांनी मांडावी आणि त्यातून अस्वस्थ करणारी कविता जन्माला यावी हे नवल कवितेच्या प्रांतात घडते आहे. समीक्षेच्या कसोट्यांना आव्हान देणारी ही कविता आहे.

(शीर्षकाच्या शोधात, डॉ. कृष्णा मस्तुद - सुविद्या प्रकाशन, पुष्ठे ५८, किंमत १०० रु.)

**मैत्रपंचमी**

मैत्रपंचमी या पुस्तकात डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी, स्वाती सामक, ज्योत्स्ना चांदगुडे, मीनल बाठे, प्रभा सोनवणे या पाच जीवाभावाच्या मैत्रिणी असणाऱ्या कवयित्रींनी आपल्या काव्यप्रवासाविषयी लिहिले आहे. प्रत्येकीच्या मनात लहानपणापासून कविता रेंगाळत होतो. कविता फुलण्याचा काळ मात्र संघर्षाचा होता. घर संसार नोकरी सांभाळून कवितेचे झाड फुलवताना मोठा संघर्ष करावा लागला. या संघर्षाने कवितेला अधिक प्रगल्भ, सकस बनविले. समानशीले व्यसनेषु सख्यम् । या न्यायाने घडलेली मैत्री काव्यप्रवासात एकमेकींना बळ देणारी जशी ठरली तशी कवितेच्या विकासालाही ती पूरक ठरली. आपल्या काव्यप्रवासातले आपले अनुभव या पाचही कवयित्रींनी अतिशय समर्पक शब्दात मांडले आहेत. वाटेतल्या खाचखळग्यांचा, भेटलेल्या व्यवहारी माणसांचा माणसांचा उल्लेख या लेखनामध्ये आहे पण कुणाविषयी कटूतेचा उद्गार नाही. ज्या निर्मळ मनाने त्यांनी कविता लिहिली त्याच भावनेने हा काव्यप्रवास त्यांनी उलगडून दाखविला आहे. बदलत गेलेली कविता. सांस्कृतिक संदर्भ, समीक्षेची मानसिकता या लेखनातून अधोरेखित झालेली आहे. आज या पाचही कवयित्रींनी चांगले नाव मिळविले आहे. पण ज्या कवितेने त्यांना खूप काही मिळवून दिले त्यासाठी त्यांनी जे सोसले. ते वाचकांना अंतर्मुख करणारे आहे. पाच कवयित्रींनी एकत्र येऊन आपल्या काव्यप्रवासाविषयी असे लेखन करणे हा काव्यप्रांतातला अभिनव प्रयोग आहे. डॉ. द. भि. कुलकर्णी यांची प्रस्तावना आणि डॉ. सुहासिनी इर्लेकर यांचे आशीर्वादपर चार शब्द यामुळे या ग्रंथाला परिपूर्णता लाभली आहे. कवितेच्या अवघड वाटेवरून जाणाऱ्या नव्या पिढीच्या कवींनी हा ग्रंथ जरूर वाचावा. ही मैत्रपंचमी त्यांना प्रेरणा आणि दिशा देईल.

(मैत्रपंचमी, डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी, स्वाती सामक, ज्योत्स्ना चांदगुडे, मीनल बाठे, प्रभा सोनवणे. दिलीपराज प्रकाशन, पुणे, पृष्ठे १०८, किंमत २०० रु.)

**प्रा. मिलिंद जोशी**
बी१-१२, रविराज टेरेस, सुखसागरनगर, कात्रज, पुणे ४११ ०४६.
दूरभाष : (०२०) २६९६३५०९, ९८५०२७०८२३



अनुक्रमणिका



श्रद्धांजली !

# कवी डॉ. कल्याण इनामदार





द्वारकानाथ लेले

पुण्यातील एक प्रतिथयश मराठी कवी डॉ. कल्याण इनामदार यांचे नुकतेच निधन झाले. महाराष्ट्र साहित्य परिषद, मराठी बालकुमार साहित्य संमेलन अशा साहित्यविषयक संस्थांशी त्यांचा घनिष्ट संबंध होताच. पण त्यांनी ३५ वर्षांपूर्वी १९७३ मध्ये पुण्यात नवोदित कवींसाठी 'काव्यशिल्प' ही स्वतंत्र संस्था स्थापन केली व ती आज उत्तमपणे कार्य करीत आहे. डॉ. कल्याण बोलके असल्याने त्यांचा लोकसंग्रह दांडगा होता. त्यात अनेक कवी, लेखक, प्रकाशक, मित्र यांचा समावेश होता.

त्यांचे एक वैशिष्ट्य म्हणजे दरवर्षी किमान शंभरपेक्षा अधिक दिवाळी अंकांमधून त्यांच्या कविता गेली अनेक वर्षे प्रसिद्ध होत आलेल्या आहेत. त्यांचे संग्रह निघाले आहेत. त्यांच्या बहुतेक कविता छोटेखानी असत. मात्र त्या अर्थपूर्ण व आशयगर्भ असत. त्यामुळे दरवर्षी भरणाऱ्या मराठी साहित्य संमेलनात त्यांना निमंत्रित कवीचा मान मिळे. आकाशवाणीतर्फे होणाऱ्या राष्ट्रीय कवी संमेलनात ते मराठीचे प्रतिनिधित्व करीत असत. अशा संमेलनांमुळे ते देशभर हिंडलेले होते.

मुलांसाठी कविता आणि कथालेखन हा त्यांचा हातखंडा होता. त्यांची आजवर मुलांसाठी सुमारे ७५ पुस्तके प्रसिद्ध झाली असून त्यांना अनेकदा राज्यपुरस्कार मिळालेला आहे. हातात कागद किंवा पुस्तक न घेता ते कोणतीही कविता वाचत. त्यांनी आयुष्यभर टेलिफोन खात्यात नोकरी केली. पण ते काव्यात रंगले. त्यांनी 'कविता आणि गीत' या विषयावर संशोधन करून पीएच्.डी. पदवी मिळवली होती. या प्रबंधाचे प्रकाशन गेल्यावर्षी ज्येष्ठ समीक्षक प्रा. द. मि. कुलकर्णी यांच्या हस्ते झाले होते.

नवोदित कवींसाठी त्यांनी स्थापन केलेली 'काव्यशिल्प' ही संस्था त्यांचे चिरंजीव स्मारक ठरणार आहे. १९७३ च्या सुमारास ते आणि मी एका लग्नात शेजारीशेजारी जेवण्यास बसलो होतो. साहित्यावर बोलता बोलता नवोदित कवींना व्यासपीठच मिळत नसल्याची खंत मी डॉ. कल्याणांकडे बोलून दाखवली. त्यावर 'आपण नवोदित मराठी कवींचे संमेलन भरवू या' अशी कल्पना त्यांनी मांडली आणि त्यातूनच १९७३ च्या उत्तरार्धात महाराष्ट्र कवी यशवंत यांच्या उपस्थितीत भारत इतिहास संशोधक मंडळाच्या सभागृहात 'काव्यशिल्प' संस्थेची स्थापना झाली. या संमेलनाला पुण्यातील व बाहेरगावचे शंभर नवोदित कवी उपस्थित होते. महिन्यातून एकदा (शक्यतो तिसऱ्या शनिवारी सायंकाळी) एखाद्या सोयीस्कर ठिकाणीच जमायचे, प्रत्येकाने दोन कविता वाचायच्या, त्यावर चर्चा करायची. आणि त्याच्या खर्चासाठी नाममात्र वार्षिक वर्गणी घ्यायची. व्यवस्थेसाठी सभासदांमधूनच दरवर्षी अध्यक्ष व कार्यवाह असे दोनच पदाधिकारी निवडायचे अशा सोप्या कार्यपद्धतीमुळे ही संस्था आज ३५ व्या वर्षीही उत्तमपणे चालली आहे.

डॉ. कल्याण यांनी त्यांच्या ओळखीच्या अनेक ज्येष्ठ कवींना काव्यशिल्पात आणले; आणि स्वतः काव्यक्षेत्रातील अनेक संकल्पना स्पष्ट करून नवोदितांची काव्यविषयक जाण वाढवली. ज्या इतिहास संशोधक मंडळात या संस्थेची स्थापना झाली त्याच जागेत कवी मंगेश पाडगावकर यांच्या उपस्थितीत काव्यशिल्पचा रौप्यमहोत्सव साजरा झाला. आज प्रतिथयश असलेल्या विमल लिमये, आसावरी काकडे, स्नेहसुधा कुलकर्णी, दीपक करंदीकर, कै. सुधाकर नेर्लेकर, अशा कितीतरी कवींची जडणघडण काव्यशिल्प या संस्थेत झाली. आणि त्यांचे अंशतः श्रेय डॉ. कल्याण इनामदार यांच्याकडे जाते. त्यांच्या निधनाने मराठी काव्यक्षेत्राने एक उमदा, हसरा कवी गमावला आहे.

**द्वारकानाथ लेले**
१२६१ सदाशिव पेठ, पुणे ३०. फोन : २४४३२१४८



अनुक्रमणिका

□

# 'चालणारे अनवाणी पाय' –

## शेतकऱ्याच्या व्यथेतून वैभव शोधणारी कविता–

□

अरविंद ब्राह्मणे



ह्या वर्षीचा म्हणजे २००८ चा कवयित्री संजीवनी खोजे स्मृती पुरस्कार जाहीर झालाय तो प्रा. डॉ. केशव सखाराम देशमुख यांच्या 'चालणारे अनवाणी पाय' ह्या काव्य संग्रहास. जालन्याचा हा कवी उच्च विद्या विभूषित असूनही हाडाचा शेतकरी आहे. किंबहुना शेतकरी असल्याचा त्यास मोठा अभिमान आहे. कवीस आपले गाव, गावाकडची संस्कृती, तेथील अभिजात ग्रामीण सौंदर्य, ग्रामीण जीवन याविषयी विलक्षण ओढ व गोडी आहे. माणुसकीचा चेहरा हरवून बसलेली शहरे कवीने पाहिली आहेत. शहरातील माणसांच्या ठायी असलेला त्रयस्थपणा, परकेपणा याची झळ कवीने अनुभवली आहे. म्हणून ग्रामीण भागातच लहानाचा मोठा झालेल्या त्यास गावाकडची माणसे, त्याचे आप्तेष्ट, गावाकडील शेत, गुरे, वासरे, पशु, पक्षी, झाडे, निसर्ग आकृष्ट करतात. म्हणून शहरातून सुटी काढून जेव्हा कवी गावाकडे जातो; तेव्हा तो न्हाणीत पाय धुवून तडक शेतावर निघून जातो. काळ्या मातीत पायांचे तळवे मनस्वीपणे रूतवून घेतो आभाळाकडे पाहातो, डोळ्यांच्या काठोकाठ सारा परिसर गच्च भरून घेतो. असं करीत करीत सगळं वावर तो मनात झिरपू देतो. दूरवर गायी, म्हशी, बैल चारणारा कवीचा बाप तृप्त नजरेने कवीचे वैभव पाहून सुखावतो. कवी बापाच्या पायावर व मातीच्या देहावर एकाच वेळी माथा टेकवतो. तेव्हाचं सुख कवीस शहरापेक्षा गावातच अधिक सुखावह वाटतं.

ग्रामीण जीवनातील शेतकऱ्यांची व्यथा मांडताना कवी आई, बाप याबरोबरच ग्रामीण महिलेचे दुःख उलगडून दाखवितो. ग्रामीण महिला त्यास माणुसकीच्या अभ्यासक्रमातलं पहिलं पान वाटतं. महिलेस निरनिराळ्या दुःखाच्या प्रसंगाशी सामोरे जावे लागते. त्यास ती कोणाच्याही अश्रूंनी भिजणाऱ्या पापण्यांसाठी धावून आलेला पदर यासारखी भासते. ग्रामीण बाई मुलीला शिस्तीचं विद्यावळण लावणारं नालंदा विद्यापीठ, लेकीच्या उरातली न संपणारी अनाम हुरहूर वाटते. एवढ्यापुरताच तो थांबत नाही तर ती लेकराच्या अंगावर पांघरलेली उबदार कांबळं वाटते. मंगळसूत्राला जिवापाड जपणारी गळ्याची शपथ वाटते, दुरिताचे तिमिर घालवणारं ज्ञानोबाचं पसायदान वाटते. बाई धरणीची माया, आभाळाएवढी छाया. धरणांचा किनारा व अहर्निश वाहणारा वारा वाटते. हीच बाई जेव्हा त्याची आई म्हणून समोर येते; जेव्हा आईचा उष्ण, उबदार, बळदार हात कवीच्या खांद्यावर अंथरला जातो; तेव्हा ती कवीसाठी काळजात जतन करून ठेवलेली उर्जा, प्राणवायूसारखी वाटते.

काबाडकष्ट उपसून श्रमाचे ओझे वाहणारा बाप कवीस घरादाराचं वैभव वाटतो. बापाने ढोरावासराला कधीही काठी मारली नाही, दावणीला ढोर कधी बिनचाऱ्याचं ठेवलं नाही, गोठ्याचं बंधन गायीच्या डोळ्यात कधी उतरू दिलं नाही, बाप कवीस ढोरावासरांचा राणा, गुरावासरांचा हिरवा आशीर्वाद वाटतो. औत हाकताना बापास जे दुःख साहावे लागते; ते बघून कवीस भाकर गोड लागत नाही, त्याची झोप कडू होते. बैलांच्या पाठी चोंभाळणारे बापाचे हात कवीस स्वप्नांचे गरूडखांब भासतात. भिजलेले बापाचे पाय त्यास तीर्थक्षेत्रांच्या तृप्तीची ग्वाही वाटते.

बैलांना कवी त्याचे न फिटणारे ऋण असे मानतो.

(पान क्र. ४९ वर पहा...

पुस्तक परिचय

# ‘साहित्य : मूल्य आणि मूल्यांकन’




प्रा. डॉ. सुहास पुजारी

‘साहित्य : मूल्य आणि मूल्यांकन’ हा निशिकांत ठकार यांचा साहित्य विचार व समीक्षालेखांचा एक मूल्यवान ग्रंथ. साहित्यासंबंधीची मूल्यदृष्टी अधिक जाणती व विकसित करण्याची शक्ती या ग्रंथात आहे. साहित्यसमीक्षेतील मूल्यविचारासंबंधीचे या ग्रंथातील सखोल व मूलभूत चिंतन साहित्यदृष्टीला परजणारे आहे. नवी दृष्टी देणारे आहे.

‘साहित्य : मूल्य आणि मूल्यांकन’ या ग्रंथातील आरंभीचे सात लेख साहित्यसमीक्षेतील मूल्यविचारांसंबंधीचे चिंतन प्रकट करणारे आहेत. त्यानंतर पुस्तक समीक्षणाच्या पंधरा लेखांचा समावेश त्यात केला आहे. आकलन, विश्लेषण, विवेचन, समीक्षण असे या पंधरा पुस्तकांच्या मूल्यांकनाचे स्वरूप आहे. ही पंधरा पुस्तके विविध प्रकारांतली आहेत. कविता, कादंबरी, नाटक, एकांकिका, समीक्षा या प्रकारांतली ही पुस्तके आहेत. या पुस्तकाला ह. श्री. शेणोलीकर महाराष्ट्र साहित्य परिषदेचा पुरस्कार मिळाला आहे.

मराठी-हिंदी साहित्याचा अनुबंध जोडण्याचे अत्यंत महत्त्वाचे कार्य आपल्या समीक्षणात्मक लेखनातून व अनुवादप्रपंचातून ठकारांनी सातत्याने व निष्ठेने केले आहे. या समीक्षाग्रंथातही हा अनुबंध त्यांनी जपला आहे. समीक्षणासाठी त्यांनी निवडलेल्या पंधरा पुस्तकांमध्ये ‘राष्ट्रवाणी’चे एक त्रिदल त्यांनी वाहिले आहे. ‘अकविता और कला-संदर्भ : (डॉ. श्याम परमार), ‘अज्ञेय की कविता : एक मूल्यांकन’, (डॉ. चंद्रकांत बांदिवडेकर) ‘हिंदी उपन्यास : स्थिती और गती’, (डॉ. चंद्रकांत बांदिवडेकर) या तीन हिंदी पुस्तकांचा समावेश त्यात आहे.

साहित्यसमीक्षेतील मूल्यविचारासंदर्भात हा ग्रंथ अनेकविध दृष्टीने महत्त्वाचा ठरावा असा आहे.

‘संस्कृतीतून मूल्ये घडतात. मूल्यांनी संस्कृती घडते आणि या मूल्यव्यापारातूनच संस्कृती विश्वात्मकतेशी नात जोडू पाहते.’ हे मूल्यभान ठकारांनी आपल्या प्रस्तावनेत नोंदवले आहे. मूल्यसंकल्पनेविषयी असो अथवा प्रतिभा या संकल्पनेविषयी असो ठकार अतिशय विवक्षित शैलीत आपले मत प्रतिपादन करतात. ते मूल्ययुक्त व म्हणूनच चिंतनीय असते. यादृष्टीने प्रतिभा या संकल्पनेविषयी पुनर्विचार केला पाहिजे असे मत नोंदवून ते लिहितात, ‘‘स्वच्छंद कल्पनाशक्ती म्हणजे प्रतिभा नव्हे. नवनिर्माणक्षमताही पुरेशी नाही. प्रतिभेत एक दिव्यदृष्टी (व्हिजन) असावी लागते. ही दिव्यदृष्टी विश्वदृष्टीतून प्राप्त होते. विश्वदृष्टी जीवनदृष्टीतून आणि जीवनदृष्टी मूल्यमानातून. याचा अर्थ असा की प्रतिभा ही मूल्यमुक्त किंवा मूल्यशून्य नसते. तशी ती मूल्यबद्धही नसते. तिच्यामुळे मूल्यभाव उजळतो.’’ (पृष्ठ-४) प्रतिभेची व्यवच्छेदकता त्यांनी अशी सहज टिपली आहे. विचारसूत्र नेमकेपणाने पकडणे आणि त्याचे ताणे-बाणे विवरून दाखवणे हा ठकारांच्या लेखणीचा समीक्षाधर्म आहे.

प्रतिभेत दिव्यदृष्टी असते आणि ती विश्वदृष्टीतून प्राप्त होते, ही विश्वदृष्टी देशीयतेशी विरोधी असते असे नाही. तर देशीविदेशी प्रतिभावंत देशीयतेतूनच विश्वात्मकतेकडे झेप घेतात; याकडे ते लक्ष वेधतात. मूल्यविचारासंबंधी विविधांगी विचार मांडताना. ‘...आपले मूल्यविचार, आपल्या मूल्यव्यवस्था ठासून पुढे आणल्या पाहिजेत आणि निर्भयपणाने आपले मूल्यनिर्णय घेतले पाहिजेत.





अनुक्रमणिका

पाश्चात्य ते वर्ज्य असा दुराग्रही वा सनातनी विचार यामागे नाही. त्यांची हत्यारे अवश्य वापरावीत पण मूल्यविचार मात्र आपण आपलाच संपादित केला पाहिजे.'' ही जाणीवही ठकार आवर्जुन करून देतात.

'राष्ट्रवादी साहित्यशास्त्राचे पूनर्मूल्यांकन' हा या संग्रहातील अनेक महत्त्वपूर्ण लेखांपैकी एक लेख. स्वातंत्र्यवीर विनायक दामोदर सावरकरांच्या साहित्यदृष्टीचा धांडोळा घेत राष्ट्रवादी साहित्यशास्त्राचा परामर्श ठकारांनी या लेखात घेतला आहे. साहित्यातील व मूल्यविचारातील देशीयतेचे मूल्य अधोरेखित करणाऱ्या ठकारांनी सावरकरांच्या साहित्यातील देशीभानाकडेही तितक्याच डोळसपणे लक्ष वेधत सावरकरांच्या साहित्याचे यथार्थ मूल्यांकन केले आहे. यादृष्टीने 'सावरकरांच्या साहित्यशास्त्राचे पूनर्मूल्यांकन' हा लेख मुळातून पाहण्याजोगा आहे. सावरकरांचे काव्य, त्यांचे आभाशुद्धी आंदोलन, त्यांची साहित्यदृष्टी यांचा अभ्यासपूर्ण वेध घेत मराठीतील या एका श्रेष्ठ पण उपेक्षित कवीस- भाषाप्रभूस-न्याय दिला आहे. राष्ट्रवादी साहित्यशास्त्रासंबंधी विचार मांडताना, ''राष्ट्रवादात व्यक्तिमत्त्वांचा बळी दिला जाऊ शकतो तर सांस्कृतिक राष्ट्रवादात एकांगी एकरूप संस्कृतीची जोपासना करण्यासाठी विविधतेचा आणि बहुरूपतेचा बळी दिला जाऊ शकतो'' (पृष्ठ ४७) असा मूल्यगर्भ इशारा ठकारांनी दिला आहे.

'संत साहित्याचे साहित्यिक मूल्यांकन' हा लेख संत साहित्याचे परिशीलन करणाऱ्यांनी व करू इच्छिणाऱ्यांनी गांभीर्याने लक्षात घ्यावा असा आहे. असे साहित्य समजून घेण्यासाठी 'सर्जक नजर' असावी लागते. हा एलियटचा विचार ठकारांनी अधिक स्पष्ट केला आहे. ठकारांची समीक्षादृष्टी जेव्हा प्रतिपाद्य विषयाला भिडते तेव्हा विविध भाषांमधील साहित्यसंदर्भ त्यांच्या विवेचनासाठी अगदी स्वाभाविकपणे येत राहतात. मराठी संतांच्या रचनेचा, त्यांच्या कामगिरीचा वेध घेताना हिंदी भक्तिसाहित्यातील समांतर संदर्भ ते देतात. त्यामुळे प्रांतांच्या, भाषांच्या कुंपणापलीकडे त्यांची समीक्षादृष्टी वाचकांना घेऊन जाते आणि वैश्विकतेचा अनुभव देत राहते. त्यामुळे निशिकांत ठकारांची ही समीक्षा आपल्या समीक्षेस विचक्षण व बहुभाषी व्यासंगाचे अधिष्ठान लाभले असल्याने ती अधिक सत्त्वसंपन्न झाली आहे.

तिशिकांत ठकार हे मुळात हिंदी साहित्याचे अभ्यासक व प्राध्यापक, परंतु मराठी साहित्याची, अन्य भाषांमधील साहित्याची त्यांची मुशाफिरी अलक्षित राहील अशी नाही. त्याच्या खुणा त्यांच्या लेखनात, समीक्षेत उमटलेल्या दिसतात. त्याची प्रतीती त्यांनी सावरकरांच्या भाषे संबंधी केलेल्या एका विधानावरूनही सहज येऊ शकेल. ठकार लिहितात. ''शिवरामपंतांच्या तावडीतून सुटून त्यांची भाषा लोकमान्यांचा मागोवा घेत जनमनाशी सहसंवाद करण्याच्या दिशेने विकसित झालेली दिसते.'' (पृष्ठ ४६) ठकारांच्या तावडीतूनही विविध भाषांमधील साहित्यसंदर्भ असे सुटत नाहीत ते सूचकतेने व्यक्त होतात. त्यामुळेही ठकारांचे लेखन वेधक ठरते.

'गडकऱ्यांची संसारनाटके' (त्र्यं. वि. सरदेशमुख) या समीक्षेची समीक्षाही वाचनीय आहे. त्र्यं. वि. च्या समीक्षादृष्टीचा परिचय त्यातून होतो. रामलाल-शरद स्पर्शसंदर्भात सुधाकराने हा चेटूक अनुभव लग्नापूर्वी कोणाच्यातरी संबंधात चुकून माकून घेतला असला पाहिजे अशी कल्पना त्र्यं. वि. सरदेशमुख करतात. अशा बऱ्याच 'पदरच्या गोष्टी' सरदेशमुख आपल्या समीक्षेत घालतात हे सांगून म्हणून तर त्यांच्या समीक्षेला निर्मितीक्षम समीक्षा म्हणायचे असे मत नोंदवतात. 'जाणीव संपन्न समीक्षा' अशा शब्दांत ते सरदेशमुखांच्या





अनुक्रमणिका

समीक्षालेखनाचा गौरव करतात.

'बेगम समरू' (रंगनाथ तिवारी), 'काया परकाया' (रंगनाथ तिवारी), 'कुबडा नार्सिसस' (तुळसी परब), गुरूदत्त : तीन अंकी शोकांतिका (अरूण खोपकर), 'राष्ट्रधर्माचे प्रणेते : स्वामी दयानंद सरस्वती', (प्रभाकर पाठक) या पुस्तकांवरील समीक्षणात्मक लेखनही चिंतनगर्भ असे आहे.

निशिकांत ठकारांच्या समीक्षालेखनात विवेचनाच्या ओघात काहीवेळा मोठी अर्थघन सुभाषितवजा विधाने येतात. ती वाचकांना क्षणभर थबकायला लावतात, विचार करायला लावतात, उदाहरणार्थ, 'सुभाषिते म्हणजे प्रश्नांची एकतर्फी उत्तरेच असतात.' (पृष्ठ १६५), 'मौन हे एखाद्या पोहोचलेल्या गुरूचे व्याख्यान असू शकते.' (पृष्ठ ५६).

'साहित्य : मूल्य आणि मूल्यांकन' या समीक्षाग्रंथातील प्रत्येक लेख मूल्यविचाराच्या सूत्रात बांधला गेला आहे. त्यामुळे साहित्यसमीक्षेतील मूल्यविचार अधोरेखित करणारा एक मूल्यवान ग्रंथ म्हणून या संग्रहाचे महत्त्व निश्चितच लक्षणीय आहे.

**साहित्य : मूल्य आणि मूल्यांकन**
निशिकांत ठकार, सुविद्या प्रकाशन, सोलापूर
पृष्ठे : १७६, मूल्य : १४० रु.

पत्रव्यवहाराकरिता पत्ता :
**प्रा. डॉ. सुहास पुजारी,**
'अक्षरपान', ७/८, मंत्री-चंडक इस्टेट,
होटगी रस्ता परिसर, सोलापूर - ४१३००३
फोन : (०२१७) २६०५५३४
भ्रमणध्वनी : ९९६०२७२०३१

---

(पान क्र. ४६ वरून पुढे...

दारापुढील बैलांवर कवीचे विलक्षण प्रेम व माया आहे. कवीस ते देवदूतासारखे वाटतात. बैलास शेतकरी आपल्या कुटुंबातील सदस्यासारखा वागवतो. बैलावर कवीचा इतका जीव जडला आहे की, कवी पुढचा जन्म चक्क बैलाचा द्यावा म्हणून ईश्वराचा धावा करतो. समस्त कवितेतून बैलांचे संदर्भ पदोपदी आढळतात. बैल म्हणजे शिवाराची पूजा वाटते. गच्च धान्याने भरलेल्या कणगीचा मूलमंत्र नांगराच्या फाळावर कोरलेला परिश्रमाचा शिलालेख, पीकपाण्याचा हिरवा अभंग, शेताला फुटलेल्या हंगामाचा पान्हा, शेतीमाती आषाढातली आरती तसेच पांडुरंगाची महती वाटते. जन्मभर प्रामाणिक राहून काबाडकष्ट करणाऱ्या बैलावर त्याने प्राण सोडल्यावर माणसासारखे त्याचे अंत्यसंस्कार करतो. म्हणूनच कवी म्हणतो बैलाइतका मानमरातब तर माणसालाही लाभत नाही. बैल शेतावर आयुष्यभर मोकळेपणाने फिरला, मळला, लोळला ही जणू वैभवाची पार्श्वभूमीच.

संपूर्ण काव्यसंग्रहात मनाला चटका लावणाऱ्या शब्दकळा पदोपदी आढळतात. कवीचे हे, शब्दवैभव आहे. भाषेच्या वैभवात भर टाकणारे आहे. उदा. 'मिरोग पोटभर बरसून गेला म्हणजे' औतांची यात्रा, पाणभिजला ऋतू, शिवारावर श्वासांची लागवड, कुऱ्हाडीचे पीक, मरण सोहळे, उन्हाळे, पावसाळे देहावर झेलावे लागतात आधी, मग भाकरीचा दुरडोला अवगत होतो. तृप्तीचा ध्वनी, गावाकडच्या आठवर्णीची तगमग सगळा देह सोलून निघून दुखावा तशी, उतरंडीची मडकी घरंगळावीत तशी घरंगळत गेली सारी सारी हिरवी स्वप्न, गणगोत घट्ट करणारी झाडं, गार्यीच्या पापण्यांवर संथ उतरलेली सय, श्वासांना पाणी पाजून पाहिले तरी त्यास आले नाहीत हिरवे तुरे, बारमाही श्वासांचे पीक, शिव्यांचा विडा, क्रोधाचा गड, पांढऱ्याशुभ्र आठवर्णींनी 'स्वच्छ धुवून घेतले वय' अशी शब्दकळा पदोपदी आढळतात.

---

कवीचे नाव - केशव सखाराम देशमुख, काव्यसंग्रह - 'चालणारे अनवाणी पाय', प्रकाशक - अरुण जाखडे, पद्मगंधा प्रकाशन, ३६/११, धन्वंतरी सह. गृह. संस्था, पांडुरंग कॉलनी, एरंडवणा, पुणे - ३८.

**अरविंद ब्राह्मणे**
१९/२ डि.एडी. कॉम्प्लेक्स, सोलापूर रोड,
चांदणी चौकाजवळ, अहमदनगर.
मोबा. : ९८२२०४५७८१

# मी आणि माझ्या भूमिका : काही विचार



मधु जामकर

मी आणि माझ्या भूमिका हे नटवर्य चित्तरंजन कोल्हटकरांचे 'स्वगत' ते 'भरतवाक्य' असे आपल्या नाट्यप्रवासाचे, स्वतःच्या आयुष्याकडे पाहण्याचे एक ओघवते आत्मनिवेदन आहे. व्यावसायिक रंगभूमीच्या मध्यभागी उभे राहिलेले व्यक्तिमत्त्व म्हणजे चित्तरंजन कोल्हटकर होय. प्रयोगापेक्षा संहितेशी आणि अभिनयापेक्षा त्यातल्या भाषेशी त्यांचे निकटचे नाते आहे. वडील चिंतामणराव म्हणजे नाट्य सृष्टीतले 'चेतना चिंतामणीचे गाव' होते तर मुलगा 'चित्तरंजन' म्हणजे आपल्या मनाच्या रंजनाबरोबर अंगच्या वाचिक अभिनयाचे प्रबोधन होते. या उभय पितापुत्रांनी परंपरा आणि नवता यांचे वेळोवेळी समप्रमाण दाखवून रंगभूमीला ऋणी केले आहे. त्यांचा रंगभूमीवरचा ठसा 'एक सुंदर लेणी' होऊन आजही नवोदितापुढे आदर्श राहिला आहे. 'मी आणि माझ्या भूमिका' यात आत्मनिवेदन, आत्मदर्शन आणि आत्मपरीक्षण यांचा त्रिवेणी संगम दिसतो. नट हा जेव्हा कलावंत असतो तेव्हा त्यातला 'माणूस' त्याच्या कलेच्या पातळीवर स्वतःला दूर ठेवतो तर नट हा जेव्हा माणूस म्हणून वावरतो तेव्हा त्याच्या कलेची पातळी त्याला आत्मपरीक्षण करण्याची संधी देते. चित्तरंजन मधला 'मी' हा आत्मपरीक्षणासाठी भुकेला आहे; आणि 'कलावंत' कृतज्ञतेतून कृतार्थतेकडे झुकलेला आहे. त्यांच्या उभ्या आयुष्यातील नाट्याभिनयाचा आलेख पाहता ते ज्या काळात नाटक जगले तो काळ त्यांच्या या निवेदनातून पुन्हा जिवंत होतो, वाचकाला पुनः प्रत्यय आणून देतो. यातले मुखवटे जेवढे चिंतनीय झाले आहेत; तेवढेच त्याखालचे जिवंत चेहरे जगण्यासाठी नवे बळ देणारे मार्गदर्शक राहिले आहेत.

ज्या काळात प्रेक्षकांची अभिरूची नाटकातील गद्यभाषेवर उत्तेजित झाली होती; तो काळ साक्षात् करण्याचे बळ चित्तरंजन नटाचे आहे. नाटकाचा प्रेक्षक संगीत नाटक पाहणारा किंवा गद्य नाटक पाहणारा असे स्थूलमानाने विभागले जात असत; त्याकाळाचे प्रतिनिधित्व चित्तरंजन करतात. परंतु गद्य-पद्य नाटकाकडे पाहण्याची भूमिका त्यांनी वेळीच मांडली आहे. ते एका मुलाखतीत म्हणतात : "संगीत रंगभूमी हा काही स्वतंत्र प्रकार आहे हे मी मानत नाही. काही नाटकात गाणी नसतात, काहीत असतात. संगीत हे वेगळे काढता येत नाही. नुसते संगीत ठेवले तर जमणार नाही. संगीत काढून एकवेळ नाटक होऊ शकते; पण नुसते संगीत राहू शकत नाही. खरे तर नाटक आणि त्यातले संगीत हे एकमेकात विरघळून गेल्यासारखे आहे. पूर्वी संगीत नाटकातल्या गद्य नटांनाही सूर होता. गद्य नटांचा सुरेलपणा, लयबद्धता, त्याचे शब्दोच्चार करण्याची पद्धत मोहून टाकीत असे. लय ही गद्याला आवश्यक आहे." इथे गद्य-पद्य हा भेद प्रेक्षकासाठी महत्त्वाचा नाही; हे सांगून चित्तरंजनांनी आपल्या प्रेक्षकाची सुद्धा एक अभ्यासू संहिता मांडली आहे. पुढे ते नाट्यसंस्था आणि नाट्यस्पर्धा याविषयी ते मौलिक विचार देतात. एकूण नाट्यसंस्कृती आपल्या अंगी सर्व वळणाने मुरल्याचे ते दाखवून देतात, आणि हे सारे नम्रतेने. हे विशेष आहे. या साऱ्यातून रंगभूमी माध्यमाची ताकद, त्यातल्या जिवंत प्रतिसादाचे महत्त्व ज्या रंगकर्मींना आतून जाणवले आहे त्यात या नटवर्य चित्तरंजन कोल्हटकरांचे कार्य भरीव स्वरूपाचे आहे. साहजिकच त्यांच्या नाट्यकिमयेचा भूतकाळ आजही आपणास महत्त्व पटवून देतो; नव्हे भविष्याकडे ओढून नेतो. त्यांची



अनुक्रमणिका

नाटकातील आंतरिक शक्ती गडकऱ्यांचे 'भावबंधन व एकच प्याला' ही नाटकेच होती. ही नाटके संगीतप्रिय असूनही त्यातली घनःश्याम व सुधाकर पात्रे नेमकी संगीतापासून दूर जाऊन आपल्या भाषासामर्थ्यातून एक आगळीवेगळी नाट्यलय, गद्यकाव्याची झलक प्रेक्षकाभिमुख करतात. एके ठिकाणी भाषा व त्यातले शब्दांचे सामर्थ्य ते सांगतात की "शब्द ही जरी फक्त अडीच अक्षरं असली तरी अतिशय प्रभावशाली आणि लवचिक आहेत. कारण शब्दाला कसाही वापरता येतो. शब्द देता येतो, घेता येतो, टाकता येतो, झेलता येतो आणि मानलाही जातो." नटाला हे शब्दब्रह्म अवगत झाले की त्याची कला सार्थकी लागते. चित्तरंजनने आपल्या आयुष्यात हेच कार्य केले. केवळ कलावंताचे शब्द त्यांनी पाठ केले नाहीत, तर पाठांतर ही एक शक्ती असते, जिच्यामुळे सारे नाटक प्रेक्षकाला खिळून ठेवते; याचा साक्षात्कार घडविला. एका अर्थाने हा वाचिक अभिनय अधिक बौद्धिक पातळीवर वावरतो व त्यातून रोजच्या जगण्यातील जीवनसत्ये उलगडून दाखवितो. असे नाटक पाहताना एकाच वेळी वाचक आणि प्रेक्षक ही पात्रे नवा नवा भावार्थ प्रकट करतात. नाटक ही कला व्यामिश्र व सांघिक असली तरी इथे ती लेखकाच्या संहितेवर अधिक मदार ठेवत असल्याने तिचे भाषावैभव पाठांतर व प्रगटीकरण यामुळे प्रेक्षकाला चैतन्य देऊन जाते. नाट्यगृहाबाहेर प्रेक्षक गेल्यानंतरही हे भाषा चिंतन प्रेक्षकात चालूच राहते. चित्तरंजन हे या अपूर्व किमयेचा एक अविभाज्य घटक असल्याने त्यांच्या भूमिका या प्रेक्षकासाठी आणि वाचकासाठी सदैव चिंतनीय राहिल्या आहेत. नाटक व प्रयोग यातले नाटक हे पद त्यातल्या संहितेमुळे, भाषासामर्थ्यामुळे आजही मोहित करते, ते या भाषावैभवामुळे. नाटकातली स्वगते अजरामर राहतात ती यामुळेच. यामुळेच चित्तरंजनासारखे नट मराठी रंगभूमीचा एक महत्त्वाचा घटक झाले आहेत. या भूमिकेतले विविध भाव ज्या रसनिष्पत्तीतून अवतीर्ण होतात, ते प्रेक्षकाला अंतर्मुख करतात.

अनेक वर्षांची परंपरा असलेल्या रंगभूमी मध्ये काम करणाऱ्या चित्तरंजनानी लोकांना रीतसर नाट्यशिक्षणाची गरज आहे याची जाणीव करून दिली आहे. भाषेबरोबर नाटकातील वास्तवतेविषयीही ते बोलतात.

वास्तवता हे नाटकाचे केवळ एक अंग आहे. मात्र ते एकमेव अंग नाही हे ओळखून त्यातली कल्पकता, जो काव्याभास, प्रेक्षकांना दाखवून देते त्याचे कलात्मक सामर्थ्य या नटवर्य बापलेकांनी वेळोवेळी प्रकट करून, नाटक पाहणे हाहि एक कलादर्शनाचा भाग आहे याची जाणीव करून दिली. आपली भूमिका परिश्रमपूर्वक नाट्यशिक्षणाचा पाया रोवते याकडे त्यांनी लक्ष वेधले. नवी नाटके करताना विशेषतः विजया मेहतांचे दिग्दर्शन अभ्यासताना (मुद्राराक्षक : चाणक्य) या नटामधला अभ्यासू नाट्यविवेक दिसतो. म्हणजेच नाट्यशिक्षण हा रंगभूमी व्यवहारातला अविभाज्य भाग व्हायला हवा. या गोष्टीची जाण रंगकर्मीयांना हवी. या दृष्टीने चित्तरंजनचे १९८४ मधील इंदूर नाट्यसंमेलनातील अध्यक्षीय भाषण केवळ भूतकाळातील व वर्तमानकाळातील रंगकर्मींना वंदन करणारे झाले नसून अभ्यासाची नवी दिशा वाचकांना दाखविणारे आहे. त्यांच्या मते दिग्दर्शक हा 'हालचाली सकट, शब्दोच्चारासकट त्याच्या स्वरासकट सांगायचा आणि त्यानंतर तुमच्या स्वतंत्र बुद्धीने त्याला काही तुम्ही सांगितले आणि ते त्याला पटले तर तो स्वीकारायचा' असा हा दिग्दर्शकाचा वस्तुपाठ ते दाखवतात. आपल्या या आत्मनिवेदनात वेगवेगळ्या भूमिकेमागचे प्रयोजन सांगून त्यांनी नटाच्या अभ्यासाचा नवा आदर्श दाखविला आहे. नटवर्य चिंतामणराव, गणपतराव जोशी, केशवराव दाते आणि बालगंधर्व हे हिमालयाच्या उंचीचे नट म्हणून त्यांनी स्वतःला 'मातीच्या टेकड्या' म्हटले आहे. यात केवळ शालीनता नसून आपल्या अभ्यासाची मर्यादा ते दाखवून देतात. आपल्या हयातीत नाट्यकलेला चित्रपट कलेचे ग्रहण लागले, त्यात तिला अवकळा आली हे जरी खरे असले तरी सवंग लोकप्रियता, करमणुकीचे वर्चस्व व नको तेवढे वेळेचे बंधन यामुळे जो मागच्या रंगभूमीत अभ्यास करण्याचा हव्यास होता तो या काळात आपण गमावून बसलो. आजही दूरदर्शनातील मालिकेच्या दडपणाखाली आपण केवळ 'पाहणारे' अभ्यासशून्य घरातले प्रेक्षक झालो आहोत. ही सारी खंत चित्तरंजन या नटाची असून आपण ती लक्षात घेतली पाहिजे. प्रेक्षक हा नाटकात केवळ बघ्याची भूमिका करीत नसतो, तो त्या नाटकाचा एक मुख्य घटक असतो. प्रेक्षक आणि नट या दोघांचा रसनिष्पत्तीचा संवाद म्हणजेच यशस्वी नाट्य प्रयोग असतो.



अनुक्रमणिका

चिंतामणरावांचे 'भावबंधन' आणि चित्तरंजनांचे 'भावबंधन' यात केवळ तपशिलाचा फरक आहे, तत्त्वाचा नाही. हे त्यांनी आपल्या घनःश्यामच्या भूमिकेतून, मोरेश्वर भूमिकेतून दाखविले आहे. या नाटकात प्रथम त्यांनी ४ फेब्रुवारी १९४४ मध्ये काम केले. वडील घनःश्याम व चित्तरंजन मोरेश्वर होते. त्यातली मोरेश्वराची भूमिका पाहून वडील चिंतामणरावांनी दिलेली पावती चित्तरंजनने "मी जो त्यावेळी पडल्यानंतर उभा राहिलो तो आजतागायत उभा आहे." या सुंदर वाक्यात दिली आहे. या पुस्तकाच्या प्रस्तावनेत प्रभाकर पेंढारकर यांनी चित्तरंजनांच्या भूमिकेविषयी लिहिले आहे. "भावबंधन, एकच प्याला, विषवृक्षाची छाया ही नाटकांची नावे बदलत होती. बरोबर कलाकार, दिग्दर्शक, लेखक, नाट्यगृहे, गावे बदलत होती. नाटकाचे स्वरूप बदलत होते, सादरीकरणाचे तंत्र बदलत होते, विषय बदलत होते; तरी एक गोष्ट सातत्याने राहिली ती म्हणजे प्रेक्षकांचा मिळणारा प्रचंड प्रतिसाद आणि ह्या कलाकाराची रंगदेवतेवरील परमनिष्ठा." या निष्ठेमुळेच नटवर्य चित्तरंजन कोल्हटकर, किर्लोस्कर, खाडिलकर, कोल्हटकर, गडकरी, सावरकर आणि कानेटकर यांना स्वतःच्या भूमिकेतून प्रकाशझोतात आणतात. 'माझी भूमिका' यातली दोन्ही पदे यादृष्टीने सार्थ झाली आहेत. या साऱ्यांचा आढावा घेताना त्यांनी पुन्हापुन्हा कायिक, वाचिक अभिनयाचे महत्त्व पटवून दिले आहे. नाटकाची तालीम म्हणजे केवळ पाठांतर करणे नव्हे; तर दिग्दर्शक व एकमेकांच्या सहकार्यातून नाट्यप्रयोग उभा करणे होय हे नाट्यसत्यही ते दाखवून देतात. आपली वैयक्तिक प्रतिमा उंचावण्याचा प्रयत्न त्यांनी तालमीत केला नाही. सारेच इथे कलाकार असल्याने व ते जबरदस्त ताकदीचे असल्याने ते तालमीत उभे राहिले की, त्यातून नाटक आपोआप आकारायला यायचे. असा आपला अनुभव ते देतात. तालीम ही आजची कार्यशाळा नसून ती पूर्वीची अभ्यासशाळा होती याकडेही लक्ष खेचतात. आपल्या व्यवसायाचे, भूमिकांचे मूळ कुठेतरी पुन्हा एकदा शोध घ्यायची वेळ आली आहे. गद्य कलाकाराच्या शब्दाची लय सुटत चालली आहे. शब्दांनाही, स्वर असतो याचा विसर पडतोय तरी सुद्धा गणपतराव जोशी, सारखा नट रंगभूमीवर होणारच नाही असे माझ्या स्वप्नातही येणार नाही." अशी खंत व आशावादही ते व्यक्त करतात. यातूनच त्यांचे स्वगत 'आयुष्य किती उरले आहे. मला माहीत नाही पण मी वाट पाहीन. कुणीतरी.. कुणीतरी यातून घडावं; या आशावादी स्वराने संपते.

चित्तरंजनांनी दुर्गाबाई, शांताबाई, ललिता पवार, हंसा वाडकर, इंदिरा चिटणीस आणि लता मंगेशकर यांच्याविषयी कृतज्ञतेने, प्रसन्नतेने पण मोजकेच लिहिले आहे. पण त्याहीपेक्षा गडकरी पत्नी रमाबाईविषयी व त्यांच्या शेवटच्या आजाराविषयी जे लिहिले; ते अपूर्व व हृदयस्पर्शी आहे. त्यावेळचे पंतप्रधान पी. नरसिंहराव यांनी सांत्वनपर पत्र पाठविले होते. चित्तरंजन यांचे 'जीवाचे जीवन' रमाबाई हे होते. असा भाव आहे; आणि आपले आराध्यदैवत गडकरी यांची ती पतिव्रता पत्नी होती, हा मूल्यभाव आहे. लेखकाने हा सारा प्रसंग हृदयस्पर्शी केला आहे. एकूण आपल्या आयुष्याचं पुस्तक वाचण्यात ज्यानं जन्म घालविला त्यानेच 'जे टक लावून पाहायचं नाही ते नाटक' अशी नाटकाची सुंदर व्याख्या केली आणि आपल्या भूमिकेचे भरतवाक्य सांगितले.

**मधु जामकर**
'दिलासा' स्नेह नगर, परळी वैजनाथ - ४३१ ५१५. फोन : ९८५०२९४६८६

'मी आणि माझ्या भूमिका' चित्तरंजन कोल्हटकर,
पृष्ठे डेमी - १४४, मूल्य रु. : ११०/-,
प्रकाशक : रसिक आन्तरभारती द्वारा रसिक साहित्य प्रा. लि.
अप्पा बळवंत चौक, पुणे ४११ ००२.



अनुक्रमणिका

□

# कार्यवृत्त नोंद
## (०१ जून २००८ ते ३१ ऑगस्ट २००८)

□

डॉ. माधवी वैद्य, प्रमुख कार्यवाह

---

**२१ ऑगस्ट २००७ :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे आणि कै. पु. भा. भावे स्मृतिसमितीच्या संयुक्त विद्यमाने कै. भावेंचा २७वा स्मृतिदिन श्री. म. जोशी यांच्या अध्यक्षतेखाली साजरा झाला. साहित्य सेवेबद्दल साताऱ्याचे डॉ. वि. र. काळे यांना तर साहित्यसमीक्षेबद्दल डॉ. द. भि. कुलकर्णी यांना तर नाट्यसमीक्षेबद्दल डॉ. वि. भा. देशपांडे यांना यानिमित्ताने समितीच्या वतीने पुरस्कार देण्यात आले. 'भावे आणि जी. ए. दोन सरोवरे' या विषयावर डॉ. द. भि. कुलकर्णी यांचे व्याख्यान झाले. श्रीधर वि. सहस्रबुद्धे यांनी डॉ. वि. र. काळे यांचा परिचय करून दिला. डॉ. द. भि. कुलकर्णींचा परिचय क्रांतिसेन आठवले यांनी करून दिला. मधू नेने यांनी डॉ. वि. भा. देशपांडे यांचा परिचय करून दिला. प्रा. मिलिंद जोशी यांनी सूत्रसंचालन केले. डॉ. प्रसाद पिंपळखरे यांनी आभार मानले.

**२७ ऑगस्ट २००७ : कै. बाबुराव व कै. सौ. शांतादेवी शिरोळे पुरस्कार वितरण :**

डॉ. न. म. जोशी यांच्या हस्ते बालसाहित्यकार डॉ. लीला दीक्षित यांना कै. बाबूराव शिरोळे बालसाहित्य ग्रंथकार पारितोषिक देण्यात आले. तसेच कै. सौ. शांतादेवी शिरोळे लेखिका पुरस्कार मनस्विनी लता रवींद्र यांना देण्यात आले. हे पारितोषिक दरवर्षाआड १४ जुलै रोजी देण्यात येते.

**१२ जानेवारी २००८ : न्यायमूर्ती रानडे स्मृतिदिन :**

कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी स्वागत व प्रास्ताविक केले. 'न्यायमूर्ती रानडे यांचे सामाजिक योगदान' याविषयावर डॉ. वि. मा. बाचल यांचे भाषण झाले. श्री. वि. सहस्रबुद्धे यांनी कार्यक्रमाची रूपरेषा व वक्तांचा परिचय करून दिला. प्रा. मिलिंद जोशी यांनी आभार मानले.

**२८ फेब्रुवारी २००८ : विज्ञान दिन :**

विज्ञान परिषद व म. सा. प. यांच्या संयुक्त विद्यमाने डॉ. द. र. बापट (कृषितज्ज्ञ) यांचे 'विज्ञान आणि महाराष्ट्रातील शेती' या विषयावर व्याख्यान झाले. प्रास्ताविक म. ना. गोगटे यांनी केले तर सूत्रसंचालन नंदा सुर्वे यांनी केले.

**२२ मे २००८ :**

ज्येष्ठ नाटककार विजय तेंडुलकर यांना श्रद्धांजली अर्पण करण्यासाठी सभा आयोजित केली होती. श्री. रामदास फुटाणे, सतीश आळेकर, श्रीनिवास भणगे, लालन सारंग, गो. पु. देशपांडे व डॉ. वि. भा. देशपांडे यांची श्रद्धांजलीपर भाषणे झाली.

**८ जून २००८ :**

साहित्य अकादमी व म. सा. प. पुणे यांच्या वतीने 'जी. ए. कुलकर्णी व्यक्ती आणि वाङ्मय' या विषयावर डॉ. म. द. हातकणंगलेकर यांचे व्याख्यान झाले. साहित्य अकादमी, मुंबईचे कृष्णा किंबहुने यांनी प्रास्ताविक व आभार मानले. हा कार्यक्रम साहित्य अकादमीच्या 'थ्रू माय विंडो' या उपक्रमांतर्गत आयोजित करण्यात आला होता.

**२३ जून २००८ : स्वामी स्वरूपानंद स्मृती व्याख्यान :**

स्वामी स्वरूपानंद सेवा मंडळ व म. सा. परिषदेच्या वतीने स्वामी स्वरूपानंद यांचा स्मृतिदिन साजरा करण्यात आला. हा कार्यक्रम आनंद मंगल कार्यालयात झाला. सर्वांचे स्वागत परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी केले. कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी सूत्रसंचालन केले. श्री. पटवर्धन यांनी चैतन्य महाराज देगलूरकर यांचा

परिचय करून दिला. नानासाहेब मालशे यांच्या हस्ते त्यांना शाल अर्पण करण्यात आली. 'ज्ञानेश्वरीतील संत महात्म्य' यासंबंधीचे आपले विचार सांगणारे प्रवचन चैतन्यमहाराजांनी केले. दीपक करंदीकर यांनी आभार मानले. त्यानंतर संत ज्ञानेश्वर व स्वामी स्वरूपानंद यांच्या आरतीचे सामूहिक गायन झाले.

**२९ जून २००८ : कै. दि. बा. मोकाशी स्मृतिदिन :**

आषाढी पंढरपूरवारी निमित्त 'दिंडी चालली... चालली' हा भक्तिसंगीत गायनाचा बहारदार कार्यक्रम सुप्रसिद्ध गायिका चारुशीला बेलसरे यांनी सादर केला. डॉ. अरविंद नेरकर यांनी विशेष निरूपण केले. स्वागत, प्रास्ताविक व आभार प्रदर्शन परिषदेचे कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी केले.

**१२ जुलै २००८ :**

'नवं कोरं' या उपक्रमांतर्गत परिषदेचे कार्याध्यक्ष व ज्येष्ठ नाट्यसमीक्षक डॉ. वि. भा. देशपांडे यांची मुलाखत शैला मुकुंद व प्रा. मिलिंद जोशी यांनी घेतली. तसेच कोषाध्यक्ष श्री. ह. ल. निपुणगे व ग्रंथालय विभाग प्रमुख श्री. अनंत जोशी आणि डॉ. वि. भा. देशपांडे यांचा एकाहत्तरीत प्रवेश केल्यानिमित्त प्रा. द. मा. मिरासदार यांच्या हस्ते यांचा सत्कार करण्यात आला. सूत्रसंचालन डॉ. माधवी वैद्य यांनी केले. तर स्वाती महाळंक यांनी आभार मानले.

**१९ जुलै २००८ : अण्णा भाऊ साठे स्मृतिदिन :**

'अण्णा भाऊ साठे व्यक्ती व वाङ्मय' या विषयावर श्री. उद्धव कानडे यांचे भाषण झाले.कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी प्रास्ताविक व आभार मानले.

**२० जुलै २००८ :**

पी.डी.ए. या पुण्यातील एक ज्येष्ठ नाट्यसंस्थेचा 'सहस्रचंद्र दर्शन' हा नाट्यप्रयोग भरत नाट्यमंदिरामध्ये आयोजित करण्यात आला. म. सा. प. च्या नाट्यविभागातर्फे परिषदेच्या सभासदांसाठी ह्या खास नाट्यप्रयोगाचे सादरीकरण करण्यात आले होते.

**२० जुलै २००८ :**

परिषदेशी संबंधित असलेले नाट्य अभ्यासक प्रा. डॉ. सुषमा जोगळेकर व कवी डॉ. कल्याण इनामदार यांना भावपूर्ण श्रद्धांजली वाहण्यात आली. दीपक करंदीकर, डॉ. कल्याणी दिवेकर, सुषमा जोगळेकर यांचे बंधू सतीश व सुरेश नातू, उद्धव कानडे, अरुण जाखडे, दत्ता टोळ, प्रा. मिलिंद जोशी यांनी श्रद्धांजलीपर भाषणे केली. अध्यक्षस्थानी डॉ. न. म. जोशी होते. प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य यांनी सूत्रसंचालन केले. डॉ. कल्याणी दिवेकर यांनी शोक ठरावाचे वाचन केले.

**२१ जुलै २००८ : कै. वामन मल्हार जोशी स्मृतिदिन :**

'माझे कादंबरी लेखन' या विषयावर ज्येष्ठ लेखक डॉ. आनंद यादव यांचे व्याख्यान झाले. कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी प्रास्ताविक केले. कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी सूत्रसंचालन केले व आभार मानले. श्रोत्यांनी डॉ. यादवांशी संवाद साधला.

**३१ जुलै २००८ : संत सावता माळी स्मृतिदिन :**

डॉ. रामचंद्र देखणे यांचे 'तुका झालासे कळस' या विषयावर व्याख्यान झाले. प्रास्ताविक कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी केले. सूत्रसंचालन व आभार प्रदर्शन कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी केले.

**१४ ऑगस्ट २००८ : डॉ. गं. ना. जोगळेकर प्रथम स्मृतिदिन :**

कै. जोगळेकरांच्या कुटुंबियांनी दिलेल्या कायम ठेवीतून दरवर्षी कै. जोगळेकरसरांचा स्मृतिदिन साजरा करण्यात येणार आहे. गुरुवारी दि. १४ ऑगस्ट रोजी




## डॉ. न. म. जोशी : व्यक्ती आणि वाङ्मय

'नम' म्हणून साहित्य आणि शिक्षणक्षेत्राला सुपरिचित असलेले डॉ. न. म. तथा नरसिंह महादेव जोशी यांचे व्यक्ती म्हणूनही श्रेष्ठत्व आणि ज्येष्ठत्व आहे. साहित्यविश्वात– बालवाङ्मय, चरित्रवाङ्मय, कादंबरी, एकांकिका, स्फुटलेखन, वैचारिक वाङ्मय, अनुवाद, स्तंभलेखन अशा बहुविध प्रकारचे लेखन त्यांनी केले. त्यांच्या लेखनास महाराष्ट्र शासनाचे आणि विविध संस्थांचे पुरस्कार प्राप्त झाले आहे. ते नू. म. वि. प्रशालेत शिक्षक होते. शिक्षणशास्त्रात त्यांनी पीएच.डी. मिळविली. अखिल भारतीय बालकुमार साहित्यसंमेलनाचे ते अध्यक्ष होते. त्यांच्या वाङ्मयाचे परिशीलन करून डॉ. दिलीप गरूड यांनी हा ग्रंथ लिहिला आहे.

शिक्षण व साहित्यक्षेत्रात मार्गदर्शक असे 'नम' यांचेवरील हा ग्रंथ वाचनीय आहे.





अनुक्रमणिका

दुपारी २ ते ५ यावेळेत महाराष्ट्र साहित्य परिषद व अ. भा. म. साहित्य महामंडळ यांच्या संयुक्त विद्यमाने पहिल्या सत्रात, 'मराठी शुद्ध लेखन : माझी भूमिका' या विषयावर प्रा. प्र. ना. परांजपे यांच्या अध्यक्षतेखाली चर्चासत्राचे आयोजन करण्यात आले होते. सत्त्वशीला सामंत, श्रीमती यास्मिन शेख, डॉ. कल्याण काळे, डॉ. दत्तप्रसाद दाभोळकर यांनी चर्चासत्रात भाग घेतला. श्री. अरुण फडके यांचा लेख त्यांच्या अनुपस्थितीत कार्यवाह स्वाती महाळंक यांनी वाचला. प्रारंभी त्यांनी उपस्थितांचे स्वागत केले. कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी प्रास्ताविक केले. महामंडळाचे अध्यक्ष प्राचार्य कौतिकराव ठाले-पाटील यांनी महामंडळाची भूमिका मांडली. म. सा. प. च्या परीक्षाविभागाच्या कार्याची माहिती विभाग प्रमुख डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी यांनी दिली. दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन केले व आभार मानले. शैक्षणिक क्षेत्रातील प्राध्यापक, प्रूफ रिडर्स, साहित्यिक अशा श्रोत्यांची उपस्थिती होती. शेवटी प्रश्नोत्तरे झाली. सायंकाळी ६.३० वाजता दुसऱ्या सत्रास प्रारंभ झाला. कार्यवाह स्वाती महाळंक यांनी या सत्राचे सूत्रसंचालन केले. सकाळी डॉ. गं. ना. जोगळेकर यांच्या नावाचा पुरस्कार भाषातज्ज्ञ डॉ. अशोक केळकर यांच्या घरी जाऊन सन्मानपूर्वक देण्यात आला. त्याप्रसंगाची चित्रफीत श्री. पराग जोगळेकर यांनी उपस्थितांना दाखविली. प्रास्ताविक कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी केले. कै. जोगळेकरांच्या कन्या डॉ. उज्ज्वला जोगळेकर यांनी पुरस्कारासंबंधी माहिती दिली व पराग जोगळेकर यांनी लिहिलेली 'नक्षी' ही कविता वाचून दाखविली. प्रा. प्र. ना. परांजपे यांनी पुरस्कार प्राप्त डॉ. अशोक केळकर यांच्या कार्याविषयी विचार प्रकट केले. डॉ. केळकरांच्या पत्नी सौ. दिशा केळकर यांनी मनोगत प्रकट केले. कै. डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी लिहिलेल्या 'महाराष्ट्र व मराठी भाषा' या पुस्तकाचे प्रकाशन प्रा. द. मा. मिरासदार यांच्या हस्ते झाले. या पुस्तकाचे प्रकाशक श्रीविद्या प्रकाशनाचे श्री. उपेंद्र कुलकर्णी यांनी पुस्तकाविषयीची भूमिका सांगितली. तसेच पुस्तकाचा परिचय डॉ. कल्याणी दिवेकर यांनी करून दिला. ज्येष्ठ समीक्षक प्रा. रा. ग. जाधव यांनी आपले विचार प्रकट केले. प्रा. द. मा. मिरासदार यांनी अध्यक्षीय समारोप केला. कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी आभार मानले.

**२५ ऑगस्ट २००८ : युवामंच :**

महाविद्यालयीन विद्यार्थ्यांची बैठक आयोजित केली होती. या बैठकीत आगामी वर्षभराच्या कार्यक्रमांची रूपरेषा आखण्यात आली व युवा महोत्सवाच्या तयारी बाबत चर्चा झाली.

**२६ ऑगस्ट २००८ : पु. भा. भावे स्मृतिदिन :**

पु. भा. भावे स्मृतिसमिती आणि म.सा.प. यांच्या संयुक्त विद्यमाने भावेंचा २८ व्या स्मृतिदिनानिमित्त प्राचार्य अनिरुद्ध देशपांडे यांचे 'भावे यांच्या साहित्यातील राष्ट्रविचार' या विषयावर भाषण झाले. अध्यक्षस्थानी श्री. म. जोशी होते. प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य यांनी स्वागत व प्रास्ताविक केले. प्रा. काशिनाथ वाडेकर यांनी भावे स्मृतिसमितीच्या कार्याविषयी सविस्तर माहिती दिली. श्री. वि. सहस्रबुद्धे यांनी प्रमुख वक्ते व अध्यक्षांचा परिचय करून दिला. श्री. म. जोशी यांनी अध्यक्षीय समारोप केला. सूत्रसंचालन दीपक करंदीकर यांनी केले व भावेंचे नातू डॉ. प्रसाद पिंपळखरे यांनी आभार मानले.

**२९ ऑगस्ट २००८ :**

युवा मंचच्या वतीने 'स्त्रीभ्रूणहत्या' या विषयावर पथनाट्य सादर करण्यात आले. स. प. महाविद्यालयातील विद्यार्थ्यांनी या पथनाट्यात भाग घेतला.

**३० ऑगस्ट २००८ : नारायण धारप-एक स्मरण :**

भयकथा लेखक नारायण धारप-एक स्मरण हा कार्यक्रम आयोजित करण्यात आला. निरंजन घाटे, चित्रकार रविमुकुल, पत्रकार मानसी ताम्हणकर व विवेक सबनीस यांनी धारपांच्या आठवणी सांगितल्या. 'सोबत' ही धारपांची एक कथा मानसी ताम्हणकर यांनी सांगितली. श्री. मुकुंदराव देशपांडे यांनीही विचार प्रकट केले. प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य यांनी प्रास्ताविक केले. दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन केले व वक्त्यांचे परिचय करून दिले. कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी आभार मानले. शेवटी नारायण धारप व जयश्री गडकर यांना दोन मिनिटे उभे राहून श्रद्धांजली अर्पण करण्यात आली.

**३१ ऑगस्ट २००८ :**

फेब्रुवारी २००९ मध्ये अमेरिकेतील सॅन होजे येथे पहिले विश्व मराठी संमेलन होणार आहे. त्याचे नियोजित अध्यक्ष ज्येष्ठ लेखक डॉ. गंगाधर पानतावणे यांचा पहिला जाहीर सत्कार परिषदेचे अध्यक्ष व ज्येष्ठ लेखक

प्रा. द. मा. मिरासदार यांच्या हस्ते करण्यात आला. स्वागत व प्रास्ताविक कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी केले. रामनाथ चव्हाण, डॉ. मनोहर जाधव, महावीर जोंधळे यांनी विचार प्रकट केले. डॉ. गंगाधर पानतावणे यांनी सत्काराला उत्तर दिले. प्रा. मिलिंद जोशी यांनी सूत्रसंचालन केले व आभार मानले.

**कॉफी क्लब :**

**४ जून २००८ :**

श्री. श्याम भुर्के व सौ. गीता भुर्के यांच्याशी गप्पा झाल्या. श्री. भुर्के भरपूर वाचनातून साहित्यविषयक 'खुमासदार अत्रे' यांसारखे कार्यक्रम करतात. गप्पांच्या ओघात दोघा वक्त्यांनी अत्र्यांच्या वाटचालीचा आढावा घेतला.

**१८ जून २००८ :**

ज्येष्ठ रंगभूमी कलावंत मा. श्री. चित्तरंजन कोल्हटकर यांच्याशी अनौपचारिक गप्पा झाल्या. याप्रसंगी त्यांच्या पत्नी उपस्थित होत्या. डॉ. वि. भा. देशपांडे, डॉ. माधवी वैद्य, डॉ. कल्याणी दिवेकर, डॉ. न. म. जोशी इत्यादी मान्यवरांनी गप्पांत सहभाग घेतला. कोषाध्यक्ष श्री. ह. ल. निपुणगे यांच्या हस्ते श्री. व सौ. कोल्हटकर यांना पुष्पगुच्छ देण्यात आले.

**३ जुलै २००८ :**

परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांच्याशी नाट्यविषयक गप्पा झाल्या. श्री. मधू नेने यांनी त्याचा परिचय करून दिला. डॉ. माधवी वैद्य यांनी परिषदेच्या नव्या उपक्रमांविषयी प्रारंभी माहिती दिली.

**१६ जुलै २००८ :**

लोकप्रिय निवेदक, मुलाखतकार सुधीर गाडगीळ यांच्या गप्पांची मैफल रंगली. कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी स्वागत व प्रास्ताविक केले श्रोत्यांनी मुक्तपणे गाडगीळांशी संवाद साधला.

**६ ऑगस्ट २००८ :**

डॉ. मेधा सिधये यांच्याशी 'मॉरिशसचा मुक्काम' या विषयावर गप्पा झाल्या. प्र. के. घाणेकर, म. श्री. दीक्षित, डॉ. माधवी वैद्य, प्रा. मिलिंद जोशी, दीपक करंदीकर हे उपस्थित होते. उपस्थितांनी प्रश्न विचारले त्यामुळे गप्पा रंगल्या.

**२० ऑगस्ट २००८ :**

पत्रकार रविकिरण साने यांच्याशी गप्पा झाल्या. अद्‌भूत आयुष्यपट गप्पांच्या ओघात श्री. साने यांनी सहजपणे उलगडून दाखविला. त्यांचा परिचय श्री. मधू नेने यांनी करून दिला. आभार दीपक करंदीकर यांनी मानले. परिषदेचे पदाधिकारी डॉ. अरविंद संगमनेरकर यांच्या हस्ते मानधन व श्रीफळ देऊन श्री. साने यांचा सत्कार करण्यात आला.

**प्रमुख कार्यवाह**

---

## भिवंडी शाखा

**१३ एप्रिल २००७ :**

'माझे लघुपट' या विषयावर डॉ. अंजली कीर्तने यांचे व्याख्यान झाले.

**१ ऑगस्ट २००७ :**

'माहितीचा अधिकार' या विषयावर श्रीकांत गडकरी यांचे भाषण झाले.

**२ ऑगस्ट २००७ :**

'लो. टिळकांचे विविध गुणदर्शन' या विषयावर डॉ. शर्वरी अभ्यंकर यांचे भाषण झाले.

**५ ऑक्टोबर २००७ :**

स्व. श्री. पु. भागवत यांना आदरांजली वाहण्यात आली. अध्यक्षस्थानी प्रा. पुष्पा भावे होत्या. त्यांनी 'स्मरण एका संपादकाचे' या विषयावर व्याख्यान दिले.

**१५ नोव्हेंबर २००७ :**

'कथा अशी स्फुरते' या विषयावर प्रा. मोनिका गर्जेंद्रगडकर यांचे भाषण झाले.

**२१ एप्रिल २००८ :**

म. सा. प. शाखेतर्फे निधी जमविण्याकरिता 'ए भाऊऽऽ डोकं नको खाऊ' या नाटकाचा प्रयोग करण्यात आला

**१५ जू.. २००८ :**

कविवर्य प्रा. प्रवीण दवणे यांचे 'नवा माणूस घडविताना' या विषयावर भाषण झाले.

कार्यवाह

•••

Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : July to September 2008
Registered with the register of Newspaper for India under No. 6398/57






प्रेषक

बुक–पोस्ट

प्रमुख कार्यवाह,
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे–४११०३०.
दूरभाष : ०२०–२४४७५९६३.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

